


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

फेब्रुवारी १९८५

वर्ष ३८ । अंक ५ । फेब्रुवारी १९८५
किंमत ४ रुपये । वार्षिक वर्गणी ३० रुपये
आजीव सदस्य वर्गणी–
व्यक्ती : रु. ३००/– संस्था : रु. ५००/–

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक सहमत असतीलच, असे नाही.





संपादक

मे. पुं. रेगे

---

संपादकीय पत्रव्यवहार :

मे. पुं. रेगे,
संपादक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

---

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :

श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
(जि. सातारा)

मुखपृष्ठ : विलास सिंदकर

---

या नियतकालिकाच्या प्रकाशनार्थ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले.

# नवभारत

फेब्रुवारी १९८५

अ नु क्र म



## लेखक-परिचय


■ **अशोक नारायण ठाकूर** : मराठी विश्वकोशात भूविज्ञान, धातुविज्ञान, वातावरणविज्ञान इत्यादी विषयांचे संपादक, वाई–४१२ ८०३. ■ **पांडुरंग वासुदेव सुखात्मे** : जीवसांख्यिकीचे (बायोमेट्री) प्राध्यापक; महाराष्ट्र विज्ञानवर्धिनी, संयुक्त राष्ट्रांच्या अन्न व शेती संघटनेचे भूतपूर्व संचालक. निवास : 'सांख्य दर्शन', ६४/१२, एरंडवणे, पुणे–४११ ००४. ■ **राजीव जोशी** : डॉक्टर; विज्ञानवादी लढ्यातील आघाडीचे कार्यकर्ते; ७, सचिन हौसिंग सोसायटी, मिठानगर रोड, मुलूंड (पूर्व), मुंबई–४०० ०८१. ■ **अनिरुद्ध कुलकर्णी** : कवी, चिकित्सक लेखक व कॉन्टिनेन्टल प्रकाशनचे मालक, विजयानगर कॉलनी, पुणे–४११ ०३०. ■ **मे. पुं. रेगे** : भूतपूर्व प्राध्यापक व प्राचार्य, कीर्ती महाविद्यालय, मुंबई; संपादक 'नवभारत'; संपादक न्यू क्वेस्ट; सदस्य, महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई. निवास : 'रागिणी', साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई–४०० ०५१. ■ **ना. बा. मराठे** : निवृत्त संपादक, इंडियन नॅशनल बिब्लिऑग्राफी, सेंट्रल रेफरन्स लायब्ररी, बेल्व्हेदेर, कलकत्ता–२७; धर्मकोशाचे विशेष कार्यकर्ते, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई–४१२ ८०३. ■ **प्रतिमा केसकर** : भूतपूर्व प्राध्यापिका; निवास : द्वारा डॉ. राजा दांडेकर, लालबाग, दापोली (जि. रत्नागिरी). ■ **रा. ना. चव्हाण** : दलितमित्र, सामाजिक कार्यकर्ते, सामाजिक चळवळींचे चिकित्सक अभ्यासक व लेखक. निवास : १३७८ रविवार पेठ, वाई–४१२ ८०३.



**तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी**

**'नवभारत'तर्फे कृतज्ञ अभिनंदन !**



**जीवेत् शरदः शतम् ।**

[ अभिनंदनलेख व अन्य छायाचित्र पृ. ४६ व ४७ वर ]








अनुक्रमणिका

## संपादकीय

### विज्ञान आणि संस्कृती–३

१६–१७ व्या शतकातील युरोपमध्ये आधुनिक विज्ञान अवतीर्ण व्हायला अनुकूल अशा ज्या दोन घटकांची दखल आपण घेतली ते म्हणजे १) 'गणिती विज्ञान' ह्या ग्रीक संकल्पनेचे झालेले पुनरुज्जीवन आणि २) मानवी ज्ञानशक्ती अंतिम तत्त्वांचे नसले तरी दृश्य निसर्गातील वस्तूंच्या स्वरूपाचे यथार्थ ज्ञान प्राप्त करून घ्यायला समर्थ आहे आणि तंत्रज्ञानाचा विकास करून त्याच्या साहाय्याने इहलोकातील मानवी जीवन सुरक्षित आणि सुखी करण्याची शक्ती माणसात आहे ह्या आत्मविश्वासपूर्ण वृत्तीचा झालेला उदय. वस्तूंचे ज्ञान मिळविणे, तंत्रज्ञानाचा विकास करून आपली प्राकृतिक शक्ती वाढविणे ह्यात पाप आहे अशी एक खोल जाणीव माणसात आहे. कारण असे करण्याने माणूस आपली पायरी सोडतो. ईश्वराने किंवा दैवी शक्तींनी जे झाकलेले आहे, जे माणसापासून गूढ ठेवलेले आहे ते प्रकट करण्याचा, निसर्गातील घटनांचे नियंत्रण करण्याइतकी ताकद कमावण्याचा प्रयत्न करणे हा विश्वाच्या दैवी व्यवस्थेविरुद्ध माणसाने केलेला विद्रोह होय अशी कल्पना होती. स्वर्गातून पृथ्वीवर विस्तव आणणारा प्रॉमिथिअस हा ह्या विद्रोहाचे प्रतीक होता. ग्रीक विचारवंत ह्या पापाच्या कल्पनेतून बाहेर पडले. विश्वतत्त्वाचे ज्ञान संपादन करण्यात माणसाच्या विवेकशक्तीचे जे साफल्य सामावलेले आहे ते सर्वश्रेष्ठ असे मानवी मूल्य तर आहेच; पण ह्या ज्ञानातून मानवी आत्म्याचे विश्वातील दिव्य तत्त्वाशी नाते जोडले जाते ही प्लेटो–ॲरिस्टॉटलची शिकवण होती. ग्रीक मानवतावादाचे हे एक अधिष्ठान होते आणि रेनेसान्सच्या काळात ह्या मानवतावादाचे पुनरुज्जीवन झाले. त्याच्या प्रभावामुळे असेल पण फ्रान्सिस बेकननेही वैज्ञानिक ज्ञान आणि तंत्रज्ञान ह्यांची साधना करण्याचा माणसाचा अधिकार विश्वाच्या ईश्वरप्रणित व्यवस्थेतील माणसाच्या स्थानाशी सुसंगत आहे, किंबहुना ही साधना करणे माणसाचे कर्तव्य आहे ही भूमिका ख्रिस्ती श्रद्धेशी सुसंगत आहे ह्या मताचा पुरस्कार केला.

विज्ञानाला पोषक असलेले बौद्धिक वातावरण निर्माण करण्यात सहभागी असलेला आणखी एक घटक ध्यानात घेणे आवश्यक आहे. त्याचे स्वरूप काहीसे अस्पष्ट आहे आणि तरीही त्याला ह्या वातावरण–निर्मितीत महत्त्वाचे स्थान आहे. १५–१६ व्या शतकापर्यंत यूरोपमध्ये असंख्य स्त्रिया चेटूक करण्याच्या गुन्ह्यासाठी जाळण्यात येत असत. १७ व्या शतकात त्यांची संख्या एकदम कमी झाली. १८ व्या शतकापासून युरोपमध्ये कुणाला चेटकिणी आढळेनाशा झाल्या. खेड्यापाड्यांतून पूर्वी होत्या तश्या जख्ख, विद्रूप म्हाताऱ्या अजूनही होत्या, कोंबड्या अजूनही एकाएकी पटपट मरत, कुणाच्या गायी दूध देईनातशा होत पण चेटकिणी मात्र गायब झाल्या. १६ व्या शतकापर्यंत न्यायदानात निष्णात असलेले, निःपक्षपाती, कनवाळू वृत्तीचे न्यायाधीश समोर आलेल्या पुराव्याच्या आधारे चेटूक करण्याचा गुन्हा अनेक आरोपी स्त्रियांवर शाबीत झाला आहे असा निर्णय देत आणि कायद्याला अनुसरून त्यांना जिवंत जाळण्याची शिक्षा फर्मावीत. अठराव्या शतकापासून असा आरोप केवळ खुळचट ठरू लागला. हे स्थित्यंतर कशामुळे झाले? चेटूक सिद्ध करणारा ज्या प्रकारचा पुरावा पूर्वी उपलब्ध होता तो नंतरही उपलब्ध होता; पण ह्या पुराव्याचा जो अर्थ ह्या दोन कालखंडांत लावण्यात येत होता तो पूर्णपणे भिन्न होता. हा अर्थ लावण्यात जो बदल झाला होता तो उपलब्ध झालेल्या आणखी कोणत्यातरी पुराव्यावर आधारला होता असे नाही. संबंधित पुरावा तोच, आणि तसाच होता. पण त्याच्याकडे पाहण्याच्या दृष्टिकोणात बदल झाला होता.

अनुक्रमणिका






प्रत्यक्षानुभवाला आढळून येणाऱ्या वस्तू आणि घटना, त्यांचे परस्परसंबंध आता एका वेगळ्या वैचारिक, संकल्पनात्मक चौकटीत करण्यात येऊ लागले असे ह्या स्थित्यंतराचे वर्णन करता येईल. ह्या चौकटीचा एक भाग असा की, ज्या वस्तू आहेत त्यांचे स्वतःचे असे निश्चित स्वरूप असते, आणि हे केवळ इंद्रियगोचर असे स्वरूप असते. वस्तू आपल्याला कशा दिसतात हे काही प्रमाणात आपल्या इच्छा-भावना ह्यांच्यामुळे ठरत असते हा आपला नेहमीचा अनुभव आहे. पण वस्तूंचे हे काहीसे विकृत असे जे 'व्यक्तिनिष्ठ' दर्शन असते ते दुरुस्त करता येते आणि तिचे स्वतःचे जे 'वस्तुनिष्ठ' स्वरूप असते ते हस्तगत करता येते. कारण एका निरीक्षकाच्या वैयक्तिक दृष्टिकोणातून निर्माण झालेल्या विकृतीचे निरसन दुसऱ्या व्यक्तींनी त्या वस्तूच्या घेतलेल्या दर्शनांतून करता येते. 'भयप्रद' किंवा 'मोहक' ही विशेषणे वस्तूंच्या स्वतःच्या स्वरूपाला लावता येणार नाहीत. सर्व प्रेक्षकांच्या अनुभवात समान असलेले, केवळ इंद्रियगोचर असलेले गुणच वस्तूच्या स्वतःच्या स्वरूपाचे घटक असतील. 'वस्तुनिष्ठ वस्तुस्थिती' ही नवीन संकल्पना होती. माणूस सोडला तर उरलेले विश्व, जे आहे ते सर्व म्हणजे अशा वस्तुनिष्ठ वस्तुस्थितींचा समुदाय होय.

ह्या चौकटीचा दुसरा भाग असा : जी वस्तुस्थिती असते, म्हणजे एखाद्या वस्तूचे असे असे गुणधर्म आहेत किंवा अमूक अमूक घटना घडली आहे ही वस्तुस्थिती, ती कोणत्यातरी सामान्य नियमाचे उदाहरण असते. वस्तूचे गुणधर्म सामान्य नियमांना अनुसरून ठरत असतात आणि घटना सामान्य नियमांना अनुसरून घडत असतात. हे नियम शोधून काढले की, वस्तुस्थितीचा संपूर्ण उलगडा होतो. ह्यापलीकडे वस्तू आणि घटना ह्यांच्यामध्ये काही गूढ, दडलेले असे काही नसते. जोपर्यंत ह्या सामान्य नियमांचे ज्ञान झालेले नाही तोपर्यंत कोणतीही घटना गूढ असते. आणि जेव्हा हे ज्ञान होते तेव्हा हे गूढ पूर्णपणे उकलले जाते. ह्या दृष्टीने सर्वच गूढ आहे आणि काहीही गूढ नाही.

ह्या दृष्टिकोणाला प्रतीत होणारे जग कोरडे आहे. वस्तूंच्या स्वरूपात माणसाच्या भावना, इच्छा मिसळलेल्या नसतात. वस्तू माणसाच्या इच्छा-आकांक्षांना प्रतिसाद देणाऱ्या नसतात. असा कोणताही अनुबंध वस्तू आणि माणूस ह्यांच्यामध्ये नाही. किंवा वस्तू माणसांसारख्याच पण तरीही काहीशा किंवा बऱ्याच वेगळ्या स्वरूपाच्या नसतात. म्हणजे असे की, त्यांच्या ठिकाणीही काही प्रेरणा असतात, त्यांच्या पूर्तीसाठी त्या धडपडत असतात; पण मानवी प्रेरणांहून ह्या वेगळ्या प्रकारच्या प्रेरणा असतात असे नाही. कुत्रा माणसाहून वेगळा पण काहीसा माणसासारखा असतो. त्याचा धनी परगावी गेल्यावर त्याला होणारे दुःख आपल्याला समजू शकते. वनस्पतीही पावसात तृप्त, सूर्यप्रकाशात उल्हसित दिसते. मातीही पाण्यासाठी आसुसल्यासारखी दिसते. पण हे सर्व भ्रम आहेत. वस्तूंचे गुणधर्म आणि त्यांना घडणाऱ्या घटना ह्या केवळ सामान्य नियमांना अनुसरून ठरत असतात. वस्तूंच्या ठिकाणी असलेल्या कोणत्याही प्रेरणांच्या आविष्काराशी त्यांचा संबंध नसतो. अशा प्रेरणा वस्तूंच्या अंगी नसतात. ह्या अर्थाने वस्तूंना केवळ पृष्ठभाग असतो, 'आंतरिक' आशय नसतो.

ॲरिस्टॉटलला दिसणारे जग वेगळे होते. ज्वाला वरती उफाळत असते कारण अग्नी किंवा तेजस हे सर्वश्रेष्ठ तत्त्व आहे आणि म्हणून त्याचे स्वाभाविक स्थान जगाच्या वरच्या प्रदेशात, उदा, जेथे सूर्यचंद्र आणि तारे हे अग्निगोल वसत असतात तेथे आहे आणि आपले स्वाभाविक स्थान परत मिळवावे ही प्रेरणा ज्वालेमध्ये असते. ह्याच न्यायाने पार्थिव तत्त्वाचा बनलेला दगड कोणत्याही स्थानापासून निसटला की, पृथ्वीकडे धाव घेतो आणि तेथे पोचल्यावर विसरतो. ग्रहगोल हे अग्नी ह्या श्रेष्ठ तत्त्वाचे बनलेले असल्यामुळे विश्वाच्या दिव्य विभानात असतात. हा विभाग निर्दोष, परिपूर्ण वस्तूंचा बनलेला असल्यामुळे ग्रहगोलांची गतीही परिपूर्ण अशा मार्गाने घडत असते. वर्तुळ हा परिपूर्ण असा वक्र आहे. म्हणून ही गती वर्तुळात्मक मार्गाने होते.

सांख्य तत्त्वज्ञानही ह्याच वळणाचे आहे. माणसाचे मन, 'चित्त' आणि अनुभवाचा विषय असलेल्या वस्तू ह्या दोन्ही गोष्टी एकाच तत्त्वाच्या बनलेल्या आहेत. हा मन आणि वस्तू यांमधील

अनुबंध आहे. हे तत्त्व म्हणजे सत्त्व, रज आणि तम ह्या तीन प्रकारचे गुण. ह्यामुळे वस्तूंचा मनाला अनुभव येऊ शकतो. ह्या तीन प्रकारच्या गुणांतील सत्त्व हे गुण श्रेष्ठ दर्जाचे चांगले असतात आणि तमस प्रकारचे गुण कनिष्ठ, वाईट असतात. प्रत्येक वस्तू आणि प्रत्येक चित्त ह्या तीन प्रकारच्या गुणांच्या मिश्रणाने घडलेले असते. ज्या प्रमाणात एखाद्या वस्तूमध्ये किंवा मनोवृत्ती-मध्ये सत्त्वगुण अधिक असतात, म्हणजे ज्या प्रमाणात वस्तू किंवा मनोवृत्ती सात्त्विक असते, त्या प्रमाणात ती चांगली असते. उदा., अन्न सात्त्विक किंवा राजस किंवा तामस आसते. सात्त्विक अन्न चांगले असते. म्हणजे माणसाच्या चांगुलपणाला, सात्त्विकतेला पोषक असते.

ॲरिस्टॉटलला (आणि पुढे मध्ययुगीन स्कोलॅस्टिक दृष्टीला) किंवा सांख्यांना भासणाऱ्या जगातील वस्तूच कमी-अधिक मूल्यवान, चांगल्या होत्या. वस्तूंचे स्वतःचे स्वरूपच मूल्यवान किंवा दुष्ट होते आणि म्हणून ह्या स्वरूपाचे यथार्थ वर्णन करताना त्यांच्या मूल्याचा निर्देश करणे अटळ होते. माणूस आणि वस्तू ह्यांच्यात दरी नव्हती. नवीन दृष्टिकोणात ही दरी होती. वस्तू तटस्थ, अपक्ष असतात. त्यांना स्वतःचे मूल्य नसते. माणसाच्या भावना-आकांक्षाच्या संबंधांत केवळ त्या चांगल्या किंवा वाईट असतात. म्हणजे त्यांचा चांगुलपणा किंवा वाईटपणा हा केवळ आगन्तुक असतो. त्यांच्या वस्तुनिष्ठ स्वरूपाचा तो भाग नसतो. आणि विज्ञानात, वस्तूंचे यथार्थ ज्ञान मिळविताना वस्तूंच्या स्वतःच्या स्वरूपाचाच काय तो विचार प्रस्तुत असतो.

'आधुनिक दृष्टिकोणा'ने वस्तूंचे विश्व आणि माणूस यांची फारकत करणारी भेदरेषा किती कठोरपणे आखली होती ह्याचे गमक देकार्तच्या एका सिद्धांतात लाभते. हा सिद्धांत असा की, मानवेतर प्राणी ही केवळ भौतिक यंत्रे असतात; घड्याळासारखी यंत्रे असतात. आता पशू आणि माणूस ह्यांच्यामध्ये अनुल्लंघ्य अशी रेषा असते हा ख्रिस्ती सिद्धांत आहे हे खरे. पण त्याचा अभिप्राय वेगळा आहे. माणसाला दिव्य असा आत्मा आहे, ह्या आत्म्याचे 'तारण' होऊ शकते किंवा ईश्वराला विन्मुख होऊन तो चिरंतन अधोगतीला जाऊ शकतो आणि ह्यातील कोणता पर्याय एखादी मानवी व्यक्ती साधते हे तिच्या श्रद्धेवर, नीतिमत्तेवर व ईश्वरी अनुग्रहावर अवलंबून असते; पशूंना असा आत्मा नसतो आणि म्हणून 'तारणा'च्या ह्या दिव्य नाटकात त्यांना भूमिका असत नाही हा पशू आणि माणूस ह्यांमधील भेद आहे हे ख्रिस्ती सिद्धांताचे सार आहे. इतर प्राणी आणि माणूस ह्यांच्यात देकार्त जो भेद कल्पितो तोही फक्त माणसाला आत्मा असतो ह्या सिद्धांतावर आधारलेला आहे. पण देकार्तने मानलेला आत्मा असा तारणाच्या नाटकात सहभागी असलेला, श्रद्धा आणि अनुग्रह यांचा वाहक असलेला आत्मा नव्हे. हा आत्मा केवळ साक्षी, निरीक्षक आहे. इतर प्राण्यांप्रमाणे माणसाचे शरीरही भौतिक विश्वाचा भाग आहे. तेही केवळ यंत्र आहे. आणि ह्या शरीरयंत्रात ज्या घडामोडी असतात त्यांच्याशी माणसाच्या मनाच्या अवस्था निगडित असल्यामुळे भौतिक विज्ञानाप्रमाणे ह्या मनोवस्थांचेही विज्ञान रचता येईल; म्हणजे मानसशास्त्र रचता येईल. मग माणसात उरते, काय ? फक्त माणसाचा साक्षी असलेला, अपक्ष वस्तूंचे तटस्थपणे निरीक्षण आणि वर्णन करणारा आत्मा. आणि ह्या स्वरूपाचा आत्मा हे एवढे क्षीण असे अस्तित्व आहे की, एखाद्या कठोरहृदयी तत्त्ववेत्त्याला ते निकालात काढणे कठीण जाणार नाही. तरी एक प्रश्न उरतो. किंवा उरल्यासारखा वाटतो. असा तत्त्ववेत्ता स्वतःलाच निकालात काढत असतो काय ?

तटस्थ निरीक्षणाला उपलब्ध होणाऱ्या इंद्रियगोचर आणि अपक्ष वस्तू आणि घटना, आणि त्यांचा उलगडा करणारे सामान्य नियम ह्यांची मिळून विश्वाची अंतिम सामग्री बनत असली तरी विश्वाविषयीचे सत्य प्राप्त करून घेताना श्रद्धेला काही स्थान असणार नाही हे उघड आहे. ज्ञान-शक्तींच्या परिभाषेत बोलायचे तर वस्तू आणि घटना ह्यांच्या वस्तुनिष्ठ गुणधर्मांचे ज्ञान करून देणारे निरीक्षण आणि सामान्य नियमांची कल्पना करून ते सिद्ध ( किंवा असिद्ध ) करणारी अनुमाने कर-ण्याची शक्ती ह्याच दोन खऱ्याखुऱ्या ज्ञानशक्ती होत. वस्तूंच्या इंद्रियगोचर गुणधर्मांच्या पलीकडे

अनुक्रमणिका

असणारे असे तत्त्व जर वस्तूंमध्ये किंवा वस्तूजातामागे दडलेले असेल तर त्याचे ज्ञान निरीक्षण आणि निरीक्षणावर आधारलेले अनुमान ह्यांच्या द्वारा होणार नाही. ह्या गूढ तत्त्वाशी संबंध जोडण्याचा दुसरा कोणतातरी मार्ग उपलब्ध असावा लागेल. ह्या मार्गाची साधना करावी लागेल. गूढ तत्त्वाशी संबंध जोडण्यासाठी काही खास अधिकार कमवावा लागेल. आणि ज्यांना हा अधिकार लाभलेला नाही त्यांना अधिकारी पुरुषांकडून लाभणाऱ्या संदेशांवर श्रद्धा ठेवावी लागेल. अशा श्रद्धेशिवाय माणसे ह्या गूढ तत्त्वापासून, त्यांच्याकडे नेणाऱ्या मार्गापासून तुटलेली राहतील. किंवा ह्या गूढ तत्त्वाशी माणसाचा काही अनुबंध असेल तर ते स्वतःला, योग्य त्या अधिकारी माणसांद्वारा, सर्व माणसांसाठी प्रकट करील. म्हणजे प्रेषित असतील किंवा श्रुतिग्रंथ असतील. पण प्रेषिताचे किंवा श्रुतीचे प्रामाण्य निरीक्षण आणि अनुमान ह्यांच्या निकषांवर सिद्ध करता येणार नाही. त्यांचा स्वीकार श्रद्धेने करावा लागेल.

पण वस्तूंचे स्वरूप केवळ इंद्रियगोचर असेल आणि वस्तूंचे व घटनांचे सामान्य नियमाद्वारा संपूर्ण आकलन होत असेल तर श्रद्धेचे काही प्रयोजन उरत नाही हे उघड आहे.

ह्या ज्या 'आधुनिक' संकल्पनात्मक चौकटीचे विवरण आपण केले तिचा स्वीकार करणे म्हणजे विवेकवादी दृष्टिकोण स्वीकारणे होय अशी विवेकवादाची एक व्याख्या करता येईल.

एक प्रश्न विचारता येईल : ॲरिस्टॉटेलिअन–स्कोलॅस्टिक दृष्टिकोणापासून आधुनिक विवेकनिष्ठ दृष्टिकोणापर्यंतचे स्थित्यंतर कसे झाले ? एक वैचारिक चौकट त्याज्य ठरून तिची जागा दुसरी वैचारिक चौकट जी घेते ती कशामुळे ? ह्या प्रश्नाचे एक उत्तर असे देता येईल की, जसजसा अनुभवजन्य पुरावा वाढत जातो तसतशा पूर्वापार चालत आलेल्या संकल्पना त्याच्या निकषावर टिकू शकत नाहीत हे अधिकाधिक स्पष्ट होत जाते आणि एक वेळ अशी येते की, जुनी संकल्पनात्मक चौकटच गळून पडली आहे आणि तिची जागा नवीन चौकटीने घेतली आहे ही जाणीव आपल्याला होते.

पण हे पूर्णपणे समाधानकारक उत्तर नाही. कारण चौकट बदलते ह्याचा अर्थ असा की, पूर्वीच्या चौकटीच्या संदर्भात जो पुरावा म्हणून स्वीकारण्यात येत होता तो नवीन चौकटीच्या संदर्भात पुरावाच ठरत नसतो. नवीन किंवा वाढलेल्या पुराव्यामुळे चौकट बदलते असे नाही. तर चौकट बदलली की पुराव्याची संकल्पनाच बदलते.

ह्या प्रश्नाची लक्षात घेण्याजोगी दोन उत्तरे म्हणजे एक हेगेलने दिलेले आणि दुसरे मार्क्सने दिलेले. हेगेलचे उत्तर असे की, विश्वचैतन्य स्वतःला मानवी संस्कृतीच्या इतिहासात अधिकाधिक पर्याप्तपणे आविष्कृत करते आणि अशा प्रत्येक आविष्काराचे रूप त्यात अंतर्भूत असलेल्या संकल्पनात्मक चौकटीशी जखडलेले असते. प्रत्येक तुलनेने अपर्याप्त असलेल्या संकल्पनात्मक चौकटीत तिच्या अपूर्णतेच्या खुणा म्हणून विसंगती आणि व्याघात दडलेले असतात, आणि त्यांच्या दबावामुळे त्या चौकटीचे अधिक पर्याप्त चौकटीत परिवर्तन होते. हेगेलच्या ह्या स्पष्टीकरणामुळे कदाचित मूळ गूढ अधिक गडद होते. मार्क्सचे स्पष्टीकरण असे की, उत्पादनप्रक्रिया आणि उत्पादनसंबंध ह्यांचा मिळून समाजाचा जो भौतिक पाया बनलेला असतो त्याचे वैचारिक प्रतिबिंब ह्या संकल्पनात्मक चौकटीत पडलेले असते. सरंजामी समाजाचा भौतिक पाया एका प्रकारचा असतो आणि म्हणून त्यात प्रभावी असलेली संकल्पनात्मक चौकट एका स्वरूपाची असते. भांडवलशाही समाजाचा भौतिक पाया वेगळा असतो व म्हणून त्याची संकल्पनाचौकट वेगळी असते. ह्या स्पष्टीकरणाप्रमाणे आधुनिक भौतिक विज्ञानाचे प्रामाण्य भांडवलशाही समाजाशी सापेक्ष राहील. पण प्रत्यक्षात मार्क्सवादी असे मानीत नाहीत. उलट, मार्क्सवादाचाच 'वैज्ञानिक समाजवाद' म्हणून ते गौरव करतात.

मानवी संस्कृतीच्या इतिहासात हा 'विवेकवाद' इतक्या उशीरा का उदयाला आला हे एक गूढच आहे. सृष्टीच्या ज्ञानाशिवाय मानवी जीवनाच्या इतर क्षेत्रावर विवेकवादी दृष्टिकोणाचे कोणते परिणाम झाले हे पाहिल्याशिवाय आधुनिक संस्कृतीचे यथार्थ ज्ञान होणार नाही.

○ ○ ○



# नोबेल पारितोषिके : १९८४

अशोक नारायण ठाकूर

या वर्षीची सहा विषयांची नोबेल पारितोषिके आफ्रिका, दक्षिण व उत्तर अमेरिका आणि यूरोप या चार खंडांतल्या नऊ जणांना मिळाली आहेत. यांमध्ये झेकोस्लोव्हाकिया, दक्षिण आफ्रिका, डेन्मार्क, पश्चिम जर्मनी, इटली, नेदर्लंडस व अमेरिका या देशांतील प्रत्येकी एकजण असून ब्रिटनमधील दोघे आहेत. ब्रिटनमधील दोघांपैकी एकजण मूळचा अर्जेंटिनातील आहे; यामुळे विकसनशील देशांतून विकसित देशांकडे होणाऱ्या बुद्धिमंतांच्या स्थलांतराकडे पुन्हा एकदा लक्ष वेधले गेले आहे. तर शांततेच्या पारितोषिकामुळे दक्षिण आफ्रिकेतील वर्णभेदाविरुद्धच्या लढ्याकडे पुन्हा लक्ष वेधले गेले आहे. यूरोपियन ऑर्गनायझेशन फॉर न्यूक्लिअर रिसर्च किंवा CERN या आद्याक्षरांनी विशेष परिचित असलेल्या यूरोपीय देशांच्या संशोधन संघटनेतर्फे होणाऱ्या संशोधनकार्याला प्रथमच नोबेल पारितोषिक मिळाले आहे, तर प्रतिरक्षाविज्ञानाला (इम्युनॉलॉजीला) अपेक्षित असणारे नोबेल पारितोषिक शेवटी या वर्षी मिळाले आहे. नऊ जणांपैकी केवळ एकजणच अमेरिकेतील आहे, तर १९७९ नंतर अर्थशास्त्राचे नोबेल पारितोषिक प्रथमच बिगरअमेरिकन अर्थशास्त्रज्ञाला मिळत आहे, हे या वर्षीच्या या पारितोषिकांचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणता येईल.

## शांतता

शांततेचे नोबेल पारितोषिक ओस्लो (नॉर्वे) येथून जाहीर होते, तर इतर विषयांची पारितोषिके स्टॉकहोम (स्वीडन) येथून जाहीर होतात. कारण अठराव्या व एकोणिसाव्या शतकांमध्ये यूरोपात जी युद्धे झाली त्यांमध्ये नॉर्वे हा देश कमी प्रमाणात गुंतला होता. त्यामुळे शांततेचे नोबेल पारितोषिक देण्यासाठी ॲल्फ्रेड नोबेल यांनी या देशाची निवड केली होती. १९८४ सालचे हे पारितोषिक दक्षिण आफ्रिकेतील एका कृष्णवर्णी धर्मगुरूंना देण्यात आले आहे. राइट रेव्हरंड डेस्मंड एमपिलो टुटू हे ते धर्मगुरू होत. द. आफ्रिकेतील वंशवादी वा वर्णभेदी राजवटीविरुद्धच्या लढ्यात त्यांनी बजावलेल्या कामगिरीबद्दल त्यांना हे पारितोषिक देण्यात आले आहे. टुटू हे शांततेचे नोबेल पारितोषिक मिळविणारे या लढ्यातील दुसरे कृष्णवर्णी नेते आहेत. या आधी १९६० साली हे पारितोषिक ॲल्बर्ट जॉन लुथुली यांना मिळाले होते. ते तेव्हा आफ्रिकन नॅशनल काँग्रेस या संघटनेचे अध्यक्ष होते. हे पारितोषिक मिळाल्यावर लगेचच या संघटनेवर बंदी घालण्यात आली व परिणामी ही संघटना अहिंसक मार्गाकडून गनिमी युद्धाच्या मार्गाकडे वळली, असे मानले जाते. लुथुली हे पारितोषिक मिळण्याच्या आधीपासूनच घरात स्थानबद्ध होते व मृत्यूनेच त्यांची यातून सुटका केली (१९६७).

टुटू यांचा जन्म पश्चिम ट्रॅन्सव्हॉलमधील क्लेर्सडॉर्प या गावी २० ऑक्टोबर १९३१ रोजी झाला. त्यांना वैद्यकीय शिक्षण घेण्याची तीव्र इच्छा होती; परंतु त्यांचे वडील साधे प्राथमिक शिक्षक असल्याने पैशाअभावी त्यांना या इच्छेवर पाणी सोडावे लागले. उलट शालेय शिक्षण घेत असताना त्यांना उपनगरी आगगाड्यांत शेंगदाणे विकून थोडीफार कमाई करावी लागली. बांटू हायस्कूल, बांटू नॉर्मल कॉलेज, दक्षिण आफ्रिका विद्यापीठ, सेंट पीट्स थीऑलॉजिकल कॉलेज (रोझेटेनव्हिल) व किंग्ज कॉलेज (लंडन विद्यापीठ) येथे त्यांचे शिक्षण झाले आहे आणि त्यांनी एल्. टीएच् (लायसन्सिएट इन थिऑलॉजी) व एम्. टीएच्. (मास्टर इन थिऑलॉजी) या धर्मशास्त्रातील पदव्या मिळविल्या आहेत. त्यांच्या पत्नीचे नाव लीच असून त्यांच्या चार मुलांपैकी दोघे अमेरिकेत असतात.







टुटू १९५४–५७ या काळात प्राथमिक शिक्षक होते. १९५७ साली तेथील शासनाने मिशन-शाळा ताब्यात घेतल्यावर ते पाद्री (क्लर्जी) झाले व १९६० साली उपाध्यायाच्या (प्रीस्टच्या) हाताखालचे धर्माधिकारी म्हणजे डीकन झाले. पुढे त्यांना चर्चच्या जागतिक परिषदेची शिष्यवृत्ती मिळाल्यावर ते धर्मशास्त्राच्या अध्ययनासाठी इंग्लंडला गेले. तेथे तीन वर्षे अध्ययन करून परतल्यावर त्यांना भराभर वरची पदे मिळत गेली. धर्मशास्त्रविषयक पाठशाळेतील व्याख्याते (१९६७–६९), विद्यापीठातील व्याख्याते (१९७०–७१), चर्चच्या जागतिक परिषदेच्या धर्मविषयक निधीचे सहसंचालक (१९७२–७५), जोहान्सबर्गचे डीन (म्हणजे बिशपच्या खालील दर्जाचे धर्माधिकारी, १९७५–७६), दक्षिण आफ्रिकेने वेढल्या गेलेल्या लेसोथो या स्वतंत्र राष्ट्राचे बिशप (१९७७–७८), दक्षिण आफ्रिकेच्या चर्चच्या परिषदेचे महासचिव (१९७८–८४) आणि शेवटी नोव्हेंबर १९८४ पासून जोहान्सबर्गचे बिशप ही पदे त्यांनी भूषविली आहेत. जोहान्सबर्गचे डीन व बिशप होणारे ते पहिले कृष्णवर्णी धर्मगुरू आहेत.

केंट, हार्व्हर्ड, रूर बोकम, अॅबर्डीन (१९८१) इत्यादी विद्यापीठांनी त्यांना एलएल्. डी. (डॉक्टर ऑफ लॉज्), टीएच्. डी. (डॉक्टर ऑफ थिऑलॉजी), डी. डी. (डॉक्टर ऑफ डिव्हिनिटी), डी. सी. एल्. (डॉक्टर ऑफ सिव्हिल लॉ); तर कोलंबिया विद्यापीठाने एस्. टी. डी. (डॉक्टर ऑफ सेक्रेड थिऑलॉजी, १९८२) या सन्माननीय पदव्या दिल्या आहेत. यांशिवाय किंग्ज कॉलेजचे फेलोपद व ओनॅसिस पुरस्कार (१९८३) हे सन्मानही त्यांना लाभले आहेत.

'क्राइंग इन द वाइल्डरनेस' (१९८२) व 'होप ऑफ सफरिंग' (१९८३) ही टुटू यांची प्रसिद्ध झालेली पुस्तके आहेत. त्यांमध्ये त्यांनी दिलेली प्रवचने व व्याख्याने यांचे संकलन केले आहे. पुढे त्यांची काही वचने दिली असून त्यांवरून त्यांच्या कार्याचे स्वरूप व दिशा समजण्यास मदत होईल : १) कृष्णवर्णी लोक श्वेतवर्णी लोकांशी, अगदी कोणत्याही श्वेतवर्णीयाशी बोलू शकतात, हा देवांच्या दयेचा चमत्कारच म्हणावा लागेल. २) ते (श्वेतवर्णी) जास्तीत जास्त भयंकर कोणती गोष्ट करू शकतील तर ती म्हणजे मला ठार मारणे ही होय. तथापि मृत्यू ही काही ख्रिश्चन व्यक्तीच्या आयुष्यातील सर्वांत वाईट घटना म्हणता येणार नाही. ३) वर्णभेद हे नाझीवाद व साम्यवाद यांच्याएवढेच पाप व वाईट गोष्ट आहे. ४) काळ्या लोकांसाठी राहण्याच्या व हिंडण्या–फिरण्याच्या जागा अलग राखून ठेवणे ही नाझींच्या 'अंतिम उपाया'शी तुल्य अशी गोष्ट आहे. ५) सर्व मानवांची निर्मिती देवाच्या प्रतिभेतून झाली ही शिकवण देणारे 'बायबल' हे क्रांतिकारक पुस्तक आहे. ६) येथील शासनाचा पूर्णपणे पराभव होणे अटळ आहे. कारण ते पाप, अन्याय व जुलूम यांच्या बाजूचे आहे.

टुटू प्राथमिक शिक्षक असतानाची गोष्ट आहे. रेव्हरंड ट्रेव्हर हडल्स्टन हे धर्मगुरू टुटू यांच्या आईला आपल्या डोक्यावरची टोपी हातात काढून घेऊन अभिवादन करीत असत. वर्णभेदाविषयी अतिशय सोवळ्या असलेल्या दक्षिण आफ्रिकेसारख्या देशात एक गोरा धर्मगुरू एका सामान्य काळ्या स्त्रीला अभिवादन करतो, हे एक मोठे आश्चर्यच म्हणावे लागेल. टुटू यांना हे आगळे दृश्य वरचेवर पहायला मिळे. तसेच पुढे स्वतः टुटू यांना जेव्हा क्षयरोगाने पछाडले तेव्हा हेच रेव्हरंड हडल्स्टन टुटूंना रोज भेटायला येत असत आणि त्यांचा हा क्रम तब्बल वीस महिने अखंडपणे चालू होता. याचा टुटू यांच्या मनावर जो परिणाम झाला, बहुधा त्यामुळेच टुटू धर्मशास्त्राच्या अध्ययनाकडे वळले असावेत व नंतर पाद्री झाले. लेसोथोचे बिशप असताना त्यांनी अध्यापनाचेही काम केले. जोहान्सबर्गचे डीन झाल्यावर तेथील सुखवस्तू लोक राहत असलेल्या उपनगरातील डीनसाठी असलेल्या ऐश्वर्यसंपन्न निवासात रहायला न जाता त्यांनी सामान्य कृष्णवर्णीयांमध्ये राहणेच पसंत केले. बहुसंख्य म्हणजे सु. १·२ कोटी कृष्णवर्णी लोकांचे प्रतिनिधित्व करणाऱ्या दक्षिण आफ्रिकी चर्चच्या परिषदेचे १९७८ साली महासचिव झाल्याने त्यांना एक प्रभावशाली व्यासपीठ उपलब्ध झाले आणि त्यांनी त्याचा पुरेपूर फायदा करून घेण्याचे ठरविले. परिणामी लोकांना निर्भीडपणे प्रभावी संदेश देऊन त्यांनी वर्णभेदाविरुद्धची आपली मोहीम तीव्र करीत नेली. अशा तऱ्हेने आपले आयुष्य

सामाजिक न्यायासाठी वाहणारे टुटू त्यांच्या देशात जणू प्रेषितच बनले आहेत.

शासन करीत असलेला भेदाभेद टुटू यांना मान्य नाही व ते स्वतःला कोण्या एकाच जमातीचे मानीत नाहीत. त्यामुळे ते वांशिक ऐक्य व शांततामय बदल यांचा पुरस्कार करतात व हे म्हणणे कृष्णवर्णीयांना पटवून देताना त्यांना अनेक अडचणींना तोंड द्यावे लागते. त्यांनी स्वीकारलेल्या अहिंसक, मध्यम मार्गा-मुळे वांशिक दृष्टचा विभागल्या गेलेल्या या देशात त्यांना तारेवरची कसरत करावी लागते. कारण त्यांच्या कार्याविषयी भिन्नभिन्न क्षेत्रांतील लोकांच्या प्रतिक्रिया अगदी उलट होत असतात. सत्ताधारी गोऱ्या लोकांपैकी पुष्कळांना टुटू हे घातक असे मूल-भूत सुधारणावादी वाटतात; तर त्यांच्या मध्यम मार्गामुळे उदारमतवादी श्वेतवर्णीयांना त्यांच्या कार्याविषयी सहानुभूती वाटते; पण यामुळेच मुक्ति-संघटनांमधील कृष्णवर्णीय त्यांच्यावर टीका करतात कारण टुटू त्यांना फाजील नेमस्त वाटतात. परिणामी ऑलिव्हर टॅंबा, नेल्सन मॉंडेला वगैरें-सारखे कृष्णवर्णी नेते टुटू यांच्यापासून अलग होत गेले. दक्षिण आफ्रिकेच्या संदर्भात पाश्चात्त्य देशांच्या हात झटकून मोकळे होण्याच्या वृत्तीबद्दल ते कडवट-पणे बोलतात व तेथील अर्थव्यवस्थेबद्दल त्यांनी पुढीलप्रमाणे मत व्यक्त केले होते, "भांडवलशाही व मुक्त बाजारपेठेची अर्थव्यवस्था यांविषयी मी जे काही पाहिले आहे ते नैतिक दृष्टीने अगदी किळसवाणे आहे." उलट कृष्णवर्णीयांना सत्तेत सहभागी करून घेण्यासाठी सत्ताधारी गोऱ्यांना चर्चेच्या टेबलावर खेचण्यासाठी त्यांच्यावर बाहेरून राजकीय, राजनैतिक आणि विशेषकरून आर्थिक दडपण आणले पाहिजे असे मत असलेल्या कृष्ण-वर्णीय नेत्यांच्या मते टुटू हे या मताचा उघडपणे व ठामपणे पुरस्कार करीत नाहीत आणि त्यामुळेच त्यांना हे पारितोषिक मिळाले हे साजेसेच झाले आहे. टुटू हिंसात्मक मार्गाची भलावण करीत नाहीत; मात्र आफ्रिकन्स लोक गोऱ्या बंदुक-धारी ( हिंसाचारी ) लोकांचे कौतुक करतात; पण कृष्णवर्णी मुक्तिसैनिकांचा विषय आला की, हेच लोक युद्धविरोधी भाषा करतात, हे टुटू यांनी अनुभवले आहे. या उलट मुक्तिसैनिकांना आपण परिस्थितीला हिंसक वळण देत आहोत हे मान्य नाही; कारण परिस्थिती आधीच हिंसक बनलेली आहे, असे त्यांचे म्हणणे आहे. टुटू यांना या सर्व गोष्टींची जाणीव असल्याने त्यांनी कृष्णवर्णीयांना सत्तेत सहभागी करून घेतले नाही, तर रक्तपातही होऊ शकेल असा इशारा शासनाला वारंवार दिलेला आहे. शेवटी १९८२ साली ते म्हणाले होते, "पुढे अशी परिस्थिती उद्‌भवेल की, विरोध करण्यासाठी लोकांना हिंसेचा अवलंब करणे भाग पडेल, हे मी नाकारीत नाही म्हणून ही हिंसा किमान कशी होईल हे पाहण्याचा माझा प्रयत्न आहे." त्यामुळेच देशाचे विघटन होण्यापूर्वी तेथील परिस्थिती शांततेच्या मार्गाने बदलण्याची त्यांची धडपड चालू आहे.

टुटू यांचा अहिंसक मार्ग व धर्मगुरू म्हणून त्यांना असलेली प्रतिष्ठा यांमुळे अल्पसंख्य (१८ टक्के) गोऱ्यांनी निवडलेल्या तेथील शासनाला त्यांना गप्प करणे अवघड झाले आहे. त्यामुळेच दक्षिण आफ्रिकेतील कायद्यानुसार अजून तरी त्यांच्यावर बंदी अशी घातलेली नाही. अन्यथा बैठकीत सहभागी होणे, वर्तमानपत्रांतून निवेदने देणे व कृष्णवर्णीयांसाठी राखून ठेवलेल्या विशिष्ट क्षेत्रां-बाहेर हिंडणे-फिरणे त्यांना शक्य झाले नसते. अर्थात याचा अर्थ असा नाही की, शासनाने त्यांना अजिबातच त्रास दिलेला नाही. दक्षिण आफ्रिकेच्या चर्चच्या परिषदेचे टुटू महासचिव असताना शासनाने या उदारमतवादी संघटनेची चौकशी करून त्यांच्या-वर जाहीर टीका केली होती व त्यांच्यावर पुढील ठपका ठेवला होता : हे भांडखोर धर्मगुरू व त्यांची ही परिषद शासनाच्या विरुद्ध मोठ्या प्रमाणावर प्रचार-युद्ध करीत असून झांबियातील आफ्रिकन नॅशनल काँग्रेससारख्या बेकायदा ठरविलेल्या संघट-नांना व गटांना यांची सहानुभूती आहे. १९८० साली डेन्मार्कला गेले असता टुटू यांनी दक्षिण आफ्रिकेच्या दगडी कोळशावर बहिष्कार टाकण्याचे आवाहन केले होते. तसेच १९८१ सालच्या आपल्या अमेरिका-यूरोपच्या दौऱ्यात त्यांनी दक्षिण आफ्रिका व तेथील व्यापारी कंपन्या यांच्याविरुद्ध आर्थिक हत्यार उपसण्याचे आवाहन केले होते. या दोन्ही वेळेस त्यांचे पारपत्र ( पासपोर्ट ) काढून घेण्यात

अनुक्रमणिका

आले होते. तदनंतर त्यांना परदेशी जाण्यासाठी खास परवानगी काढावी लागते आणि त्यांच्या कागदपत्रावर 'नागरिकत्व ठरविता येत नाही' असा शेरा मारण्यात येतो. तसेच दोन वेळा त्यांना पारितोषिक स्वीकारण्यासाठी परदेशात जाण्यास मनाई करण्यात आली होती. त्यामुळेच कोलंबिया विद्यापीठाच्या अध्यक्षांनी स्वतः जोहान्सबर्ग येथे येऊन त्यांना सन्माननीय पदवी बहाल केली होती. नोबेल पारितोषिक घेण्यासाठी नॉर्वेला जाण्यास आपल्याला प्रतिबंध होईल का, असे विचारल्यावर ते म्हणाले होते, "सरकार वाटेल त्या गोष्टी करू शकते, हे मला मान्य आहे; मात्र या वेळी मला प्रतिबंध करण्याइतके ते मूर्ख आहे, असे मला वाटत नाही." आणि त्यांचा होरा खरा ठरला. त्यांनी स्वतः पारितोषिक स्वीकारले.

पारितोषिकाची घोषणा होण्याच्या सुमारास टुटू न्यूयॉर्कला होते. तेथील जनरल थिऑलॉजिकल सेमिनरीत अभ्यागत प्राध्यापक म्हणून ते तेथे गेले होते. या पारितोषिकासाठी आपले नाव विचाराधीन आहे, याची त्यांना कल्पना होती. त्यामुळे पारितोषिक जाहीर होण्याच्या आदल्या दिवशी ते अस्वस्थ होते व त्या रात्री त्यांना शांतपणे झोपही लागली नाही. सकाळी जेव्हा संयुक्त राष्ट्रातील नॉर्वेचे प्रमुख प्रतिनिधी हातात सुंदर पुष्पगुच्छ घेऊन त्या पाठशाळेत येताना दिसले, तेव्हा ही हुरहूर संपली. लगेचच पाठशाळेतील घंटानाद सुरू झाला व नंतर आभारप्रदर्शनार्थ प्रार्थनाही करण्यात आली.

"दक्षिण आफ्रिकेतील वर्णभेदाची समस्या सोडविण्यासाठी चाललेल्या चळवळीतील टुटू सर्वांना बरोबर घेऊन जाणारे नेते आहेत. मुक्ततेच्या अहिंसात्मक लढ्याला वाहून घेतलेल्या या नेत्याकडे जगाचे लक्ष वेधणे हा हे पारितोषिक देण्यामागील हेतू आहे." असे नोबेल समितीने म्हटले आहे. आणि टुटू यांनाही याचसाठी हे पारितोषिक मिळावे अशी तीव्र इच्छा होती. ते म्हणतात, "आंतराष्ट्रीय दबावाशिवाय शांततामय उत्क्रांतीची शक्यता शून्य आहे." अशा प्रकारे स्पष्ट बोलण्याचे धैर्य दाखविणाऱ्या व अहिंसक मार्गाचा अवलंब करणाऱ्या या नेतृत्वालाच केवळ नोबेल समितीने पाठिंबा दिलेला नाही; तर मानवी प्रतिष्ठा, बंधुत्व व लोकशाहीची मूल्ये यांच्या विषयीच्या कळकळीतून दक्षिण आफ्रिकेतील जे गट व व्यक्ती जगाच्या कौतुकाचा विषय बनली आहेत, त्यांनाही यामुळे दिलासा मिळाल्याने नोबेल समितीने मानवी हक्कांचाही पाठपुरावाच केला आहे.

पारितोषिक मिळाल्यावर झालेली टुटू यांची प्रतिक्रियाही अशीच होती; ते म्हणाले, "दक्षिण आफ्रिकेतील वांशिक अन्यायाविरुद्ध लढणाऱ्या सर्वांचेच हे पारितोषिक आहे. आमचे कार्य न्यायाचे आहे याचीच पावती या पारितोषिकाने मिळाली आहे व न्यायाचा विजय होणारच "........ "जगाचे डोळे माझ्याकडे लागलेले असताना माझ्या माणसांत असावे म्हणून मी जोहान्सबर्गला जात आहे." म्हटल्याप्रमाणे पारितोषिकाचा आनंद आपल्या मित्रांसमवेत साजरा करण्यासाठी ते पत्नीसह लगेचच जोहान्सबर्गला परतले तेव्हा त्यांचे तेथे वीरोचित स्वागत झाले व 'गॉड ब्लेस आफ्रिका' हे आफ्रिकी राष्ट्रवाद्यांचे गीत सर्वांनी मिळून गायिले. त्या वेळी ते म्हणाले, "यामुळे नम्रता येते, अभिमान वाटतो, आनंद होतो व दुःखही जाणवते. देशाच्या सन्मानाच्या या क्षणी साजऱ्या होणाऱ्या समारंभात पुष्कळ लोक सामील झाले नाहीत, ही माझी सर्वांत मोठी व्यथा आहे." ते या पारितोषिकाची रक्कम कृष्णवर्णी आफ्रिकी तरुणांच्या शिक्षणासाठी असलेल्या शिष्यवृत्ति–निधीला देणार आहेत.

या पारितोषिकाविषयीची बहुतेक श्वेतवर्णीयांची प्रतिक्रिया ही रागाची आहे; मात्र काही थोडे गोरे याकडे दुर्लक्ष करावे या मताचे आहेत. दक्षिण आफ्रिकेचे अध्यक्ष बोथा यांनी काहीच प्रतिक्रिया व्यक्त केली नाही. सरकारने जरी अधिकृतपणे प्रतिक्रिया व्यक्त करण्याचे टाळले, तरी तेथील दैनिकांत आलेल्या बातम्यांवरून सरकारचे मत कळू शकते. एका आफ्रिकान्स दैनिकाच्या मते टुटू यांची अनेक वक्तव्ये अशी आहेत की, त्यामुळे ते या पारितोषिकाला अपात्रच ठरतात. दुसऱ्या एका दैनिकातील बातमीचा मथळा आहे, "आणखी एक सर्वाधिक अपरिचित नोबेल पारितोषिक विजेता"; तर टुटू हे बंडखोर राष्ट्रवाद्यांचे समर्थक आहेत हे दर्शविण्यासाठी आणखी एका दैनि-

अनुक्रमणिका



काच्या अग्रलेखात म्हटले आहे, " एखाद्या सरकारच्या मांसामध्ये रुतविण्यासाठी पारितोषिकाचा सलत राहणाऱ्या काटचाप्रमाणे उपयोग करण्याची ही काही पहिलीच वेळ नाही." अर्थात या पारितोषिकामुळे त्यांचे सरकारबरोबरचे संबंध सुधारतील असे नाही. मात्र यामुळे त्यांच्या लढ्याला नवा जोम येईल, यात शंका नाही. या संदर्भातील आफ्रिकी एकता संघटनेने आदिस अबाबा येथून व्यक्त केलेली प्रतिक्रिया बोलकी म्हणता येईल. ही संघटना म्हणते, " हे पारितोषिक म्हणजे वर्णभेदी राजवटीची घटिका भरत आल्याचा तिला देण्यात आलेला तातडीचा इशाराच आहे. "

## साहित्य

या वर्षीचे साहित्याचे नोबेल पारितोषिक स्वतःच्या देशाबाहेर विशेष माहीत नसलेल्या यारॉस्लाव्ह सेफर्ट या चेकोस्लोव्हाक कवीला देण्यात आले आहे. त्यांचा जन्म २३ सप्टेंबर १९०१ रोजी एका गरीब कुटुंबात प्राग येथे झाला असून त्यांचे शिक्षणही प्राग येथेच झाले आहे. १९२८ साली मारी उल्री कोव्हा यांच्याशी त्यांचा विवाह झाला आणि त्यांना एक मुलगा व एक मुलगी आहे. काव्याशिवाय त्यांना वनस्पतिविज्ञानाची विशेष गोडी आहे.

कवी म्हणून ते १९२०–५० या काळात प्रसिद्ध व लोकप्रियही झाले. मात्र उपजीविकेसाठी त्यांना मुख्यत्वे पत्रकारितेवर अवलंबून रहावे लागले. त्यांनी विशेषकरून प्राग येथून प्रसिद्ध होणाऱ्या दैनिकांतून व नियतकालिकांमधून लेखन केले आहे. शिवाय ते पुढील नियतकालिकांचे संपादक होते : Rovnost, Brno (१९२२), Srsatee (१९३०), Pestre Kvety (साप्ताहिक, १९३०–३३), Rannino-viny (दैनिक, १९३३–३९), Norodni prace (१९३९–४५) व Prace (दैनिक, १९४५–४९). तसेच १९३० साली ते Nova scena या रंगभूमीला वाहिलेल्या मासिकाचेही संपादक होते.

Mesto v slzach (ए सीटी इन टीअर्स, १९२०), Vlnach T. S. F. (ऑन वायरलेस वेव्हज, १९२५), Ruce Venusiny (हँड्स ऑफ व्हीनस, राष्ट्रीय पारितोषिक, १९३६), Zhasnete svetla (१९३८), Svetlem odena (क्लोद्ड इन लाइट, १९४०), Kamenny most (१९४४), Prilba hlfny (१९४५), Maminka (द मदर, १९५४–राष्ट्रीय पारितोषिक, १९५५), Koncert na ostrove (कन्सर्ट ऑन आयलंड, राष्ट्रीय पारितोषिक, १९६८), Odlevani zvonn, Halleyova kometa (मोझार्ट इन प्राग; इंग्रजी, जर्मन व फ्रेंच भाषांतही प्रसिद्ध, १९७०), Morovy sloup (पेस्ट्स कॉलम, १९७८), Desnik z Picadilly (अंब्रेला ऑफ पिकॅडली, १९७८) व Vse chny krosy sveta (ऑल ब्यूटी ऑफ द वर्ल्ड, १९७८) ही सेफर्ट यांची आतापर्यंत प्रसिद्ध झालेली काही पुस्तके आहेत.

सेफर्ट यांचा पहिला काव्यसंग्रह (ए सीटी इन टीअर्स) ते अवघे १९ वर्षांचे असताना प्रसिद्ध झाला असून त्यांचे आधीचे लेखन हे आदर्श (शुद्ध) समाजवादी स्वरूपाचे म्हणता येईल असे आहे. मात्र त्यांच्या मनात गरिबांविषयी कणव असून या लेखनाला मानवतेचा स्पर्श झाला असल्याने ते केवळ प्रचारकी थाटाचे झालेले नाही. १९२०–३० या दशकात ते दोन वेळा रशियाला जाऊन आले; तेव्हापासून त्यांचा आदर्श समाजवादाविषयी काही प्रमाणात भ्रमनिरास झाला. त्यांनी स्टॅलीनवादी नेतृत्वावर टीका केली. परिणामी त्यांना पक्षातून काढून टाकण्यात आले (१९२९).

चेक साहित्यात 'पोएटिझम' नावाने ओळखण्यात येणारा एक काव्यसंप्रदाय असून सेफर्ट यांच्या नंतरच्या कविता या संप्रदायाशी जवळीक साधणाऱ्या आहेत. या संप्रदायातील कवींनी मुख्यत्वे नागरी जीवन, तांत्रिक प्रगती, जीवनातील आनंद यांचे चित्रण केले असून चित्रपट, संगीत, रेव्ह्यू (म्हणजे विडंबन काव्य, गाणी व नृत्य यांनी युक्त अशी संगितिका, पुष्कळ वेळा या संगितिकेत स्थानिक विषयावरील विडंबन असते) यांच्यासारखे कला-प्रकार व सर्कशीसारखे मनोरंजनाचे प्रकार यांचे संस्कार या संप्रदायातील कवींच्या काव्यावर झालेले आहेत. 'ऑन वायरलेस वेव्हज्' पासून सेफर्ट यांचा हा दुसरा कालखंड सुरू झाला असे मानतात. यामध्ये त्यांची कमाल प्रयोगशीलता दिसून येते; यानंतरचे त्यांचे काव्य उत्कट आत्मपरतेकडे वळले आहे. उदाहरणार्थ, 'हॅण्डस् ऑफ व्हीनस' या काव्य-

अनुक्रमणिका






संग्रहातील कविता अधिक वास्तव व प्रामाणिक असून यांत त्यांच्या भावकवितेची शैली प्रगल्भ झालेली दिसते. १९३८ नंतरच्या काळात चेकोस्लोव्हाकियाला नाझींचे जुलूम सहन करावे लागले. या राष्ट्रीय शोकांतिकेचा धक्का या कवीला विशेष जाणवला व त्यांच्या काव्याने नवे वळण घेतले. परिणामी त्यांचे काव्य अधिक गंभीर झाले. उदा., 'Svetlem odena'.

सेफर्ट यांनी ज्याप्रमाणे नाझीवादाला विरोध केला त्याचप्रमाणे त्यांनी साम्यवादी राजवटीविरुद्धही आवाज उठविला. १९६८ साली रशियाचे रणगाडे चेकोस्लोव्हाकियात दाखल झाले. तेव्हा या आक्रमणाला जमेल तेवढा व जो काही प्रतिकार करता येईल त्यात सहभागी होता यावे म्हणून त्यांनी चेकोस्लोव्हाक लेखकांच्या संघटनेचे प्रथम कार्याध्यक्षपद (१९६८-६९) व नंतर अध्यक्षपद (१९६९-७०) स्वीकारले होते. कारण अशा वेळी सामान्य माणूस गप्प बसला, तर तो त्याच्या डावपेचाचा एक भाग म्हणून समजता येऊ शकेल. मात्र लेखकाने अशा वेळी गप्प बसणे ही शुद्ध लबाडी होईल, असे त्यांना वाटते. अर्थात 'शांतता' लादता येते याचीही जाणीव त्यांना आहे. डुबचेक यांच्या काळात जो थोडेफार स्वातंत्र्य लाभले होते, त्याचा उपयोग सेफर्ट यांनी करून घेतला. या काळात त्यांनी, स्टॅलीनवादी राजवटीच्या काळात ज्या लेखकांना छळअपेष्टा सहन कराव्या लागल्या होत्या त्या लेखकांचे पुनर्वसन करण्यासाठी खूप परिश्रम घेतले. ते 'चार्टर-७७' या नावाने प्रसिद्ध पावलेल्या मानवी हक्कविषयक चळवळीचे सदस्य होते. परिणामी ६८ नंतरच्या त्यांच्या काव्यात राजकारण व नव्या राजवटीवरची गर्भित टीका आलेली आहे. असे असले तरी त्यांच्या १९६८ नंतरच्या बहुसंख्य कविता या भावकविताच असून प्रेम, वसंत ऋतू, देशप्रेम व सुंदर प्राग नगरी हेच त्यांचे विषय राहिले आहेत.

अशा प्रकारे अगदी काटेकोर अर्थाने त्यांना बंडखोर म्हणता येणार नाही. ते मध्यममार्गी असले, तरी तडजोडवादी निश्चितच नाहीत. त्यामुळे त्यांनी सरकारवरील टीका मागे घेण्यास नकार दिला व सरकारने केलेल्या मुस्कटदाबीला तोंड दिले. १९६८ नंतर सुमारे १० वर्षे त्यांचे कोणतेही नवीन साहित्य प्रसिद्ध होऊ शकले नाहीं हे खरे असले, तरी या राजवटीला त्यांना खपवून घेणे भाग पडले आहे. कारण ते चेकोस्लोव्हाकियातील सांप्रतचे सर्वांत मोठे व अतिशय लोकप्रिय कवी आहेत. त्यामुळेच त्यांचे आधीचे काव्यसंग्रह प्रसिद्ध करणे भाग पडले व हे जुने काव्यसंग्रहही लोकप्रिय झाले. या संबंधातील एका चेक कादंबरीकाराचे पुढील उद्गार लक्षणीय आहेत. "सेफर्ट हे लोकांचे कवी आहेत. शासन त्यांचा दुःस्वास करते. परंतु लोकांना त्यांच्याविषयी गाढ आदर आहे. शिवाय ते वृद्ध व आजारी असून (परदेशात) विशेष परिचित नाहीत. त्यामुळे सरकार त्यांना हात लावीत नाही."

सेफर्ट यांच्या काव्यासाठी त्यांना हे पारितोषिक देण्यात आले असून पारितोषिक देताना स्विडीश ॲकॅडेमीने कवी व काव्य यांविषयी पुढील मतप्रदर्शन केले आहे : लय व यमक यांनी युक्त असलेल्या परंपरागत काव्यप्रकारांवर प्रभुत्व असणारे ते एक सर्वश्रेष्ठ कवी आहेत. टवटवीतपणा, संवेदनशीलता व कल्पनाशक्तीचे वैपुल्य या गुणांनी समृद्ध असलेल्या त्यांच्या काव्यामुळे मानवाच्या दुर्दम्य उत्साहाची, चैतन्याची प्रतिमा डोळ्यांसमोर उभी राहते.

सेफर्ट चेकोस्लोव्हाकियाबाहेर जवळ जवळ अज्ञात आहेत. त्यांच्या तीस कवितासंग्रहांपैकी केवळ दोनच संग्रह अमेरिकेत उपलब्ध आहेत. मात्र त्यांच्या समर्थकांच्या मते सेफर्ट अज्ञात राहण्याचे कारण त्यांचे गूढ काव्य हेच आहे. कारण अशा काव्याचा दुसऱ्या भाषेत अनुवाद करणे हे अतिशय अवघड काम आहे. अशा अपरिचित कवीला हे पारितोषिक मिळाल्याने आश्चर्य वाटणे स्वाभाविकच आहे. गेल्या काही वर्षांमधील अनुभव पाहता स्विडीश ॲकॅडेमी आपल्या अशा निर्णयाविषयी चर्चा करीत नाही. परिणामी टीकाकार लगेचच अशा निर्णयामागील राजकीय हेतू तपासू लागतात. पोलीश कवी मिलॉशनंतर हे पारितोषिक पुनश्च पूर्व यूरोपीय देशांतील एका कवीला मिळाले आहे. त्यामुळे पूर्व यूरोपीय देशांतील बुद्धिवंतांवर होणारे जुलूम व साम्यवादी राजवटीमध्ये लेखनस्वातंत्र्यावर येणारी बंधने यांच्याविरुद्ध सेफर्ट उभे राहिल्याने त्यांना हे पारि-

तोषिक देण्यात आले असेल का, असा प्रश्न टीकाकार विचारू लागले.

सेफर्ट हृदयविकार व मधुमेह यांनी ग्रस्त होऊन प्रॉग येथील व्हिनोराडी रुग्णालयात पडून असताना त्यांना पारितोषिकाची बातमी समजली. रुग्णालयात जाऊन ही बातमी सांगणारे स्वीडनचे राजदूत नंतर म्हणाले की, बातमी ऐकून सेफर्ट भारावून गेले. तथापि ते अतिशय थकलेले दिसले. सेफर्ट यांच्या पत्नी मारी यांना पारितोषिकामुळे आनंद वाटला का असे विचाले असता त्या म्हणाल्या, "मी असे म्हणू शकत नाही. सेफर्ट निरोगी असते तर अधिक समाधान वाटले असते." त्यांचे हे पारितोषिक त्यांच्यातर्फे त्यांच्या कन्येने स्वीकारले; कारण ते आजारपणाने जाऊ शकले नाहीत.

## अर्थशास्त्र

स्वीडनच्या रिक्सबँक या मध्यवर्ती बँकेने पुरस्कारिलेले अर्थशास्त्राचे अॅल्फ्रेड नोबेल स्मृति–पारितोषिक १९६९ सालापासून देण्यात येत येत आहे. यापूर्वी हे पारितोषिक तिघा ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञांना संयुक्तपणे मिळालेले असून या वर्षी हे पारितोषिक मिळविणारे प्रा. सर (जॉन) रिचर्ड (निकोलस) स्टोन हे चवथे ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञ होत. राष्ट्रीय जमाखर्च लिहिण्याच्या किंवा हिशेब (अकाउंट्स) ठेवण्याच्या म्हणजे लेखाविषयक पद्धतींच्या विकासामध्ये मूलभूत स्वरूपाचे कार्य केल्याबद्दल स्टोन यांना हे पारितोषिक देण्यात आले आहे. त्यांच्या या कार्यामुळे अनुभवाधिष्ठित अर्थशास्त्रीय विश्लेषणाविषयीच्या पायाभूत सिद्धांतात खूप सुधारणा झाल्या, असे रॉयल स्विडीश अॅकॅडेमी ऑफ सायन्सेसने या पारितोषिकाची घोषणा करताना म्हटले आहे. संपूर्ण राष्ट्राच्या जमाखर्चाची ही पद्धती स्टोन यांनी १९५०–६० दशकात विकसित केली असून या पद्धतीत राष्ट्राच्या अर्थव्यवस्थेतील खाजगी व सार्वजनिक अशा अब्जावधी आर्थिक व्यवहारांचे संख्याशास्त्रातील पद्धतीच्या साहाय्याने संक्षिप्तीकरण केलेले ( साररूप दिलेले ) असते. या पद्धतीमुळे राष्ट्राच्या आर्थिक स्वास्थ्याची ठोबळ कल्पना येऊ शकते.

स्टोन यांचा जन्म ३० ऑगस्ट १९१३ रोजी झाला. वेस्टमिनिस्टर स्कूल तसेच गॉनव्हिल व कायस महाविद्यालय (केंब्रिज विद्यापीठ) येथे त्यांचे शिक्षण झाले असून त्यांनी एम्. ए. ही पदवी मिळविली आहे. त्यांचा पहिला विवाह फिओडोरा लिऑटिनॉफ यांच्याशी १९४१ साली झाला व त्यांना एक मुलगी झाली. १९५६ साली फिओडोरा यांचे निधन झाले. नंतर १९६० साली त्यांनी जिओव्हान्ना क्रॉफ्ट–मरे यांच्याशी दुसरा विवाह केला असून त्यांच्याबरोबर स्टोन यांनी लग्नापूर्वी ( १९५९ ) एक व लग्नानंतर (१९६१) एक अशी दोन पुस्तके लिहिली आहेत. सी. ई. हीथ अँड कंपनी ( १९३६–३९ ), आर्थिक युद्धतंत्रविषयक खाते ( १९३९–४० ), ब्रिटनच्या युद्धमंत्रालयातील मध्यवर्ती संख्याशास्त्रीय कार्यालय ( १९४०–४५ ), केंब्रिज येथे अनुप्रयुक्त अर्थशास्त्र विभागाचे सरसंचालक ( १९४५–५५ ) व नंतर तेथेच वित्तव्यवस्था ( फायनान्स ) व लेखांकन (अकाउंटिंग) या विषयांचे 'लीक प्राध्यापक' म्हणून काम केल्यावर १९८० साली ते तेथून सेवानिवृत्त झाले. सध्या ते केंब्रिज येथे राहतात.

किंग्ज कॉलेज ( १९४५ ), इकॉनोमेट्रिक सोसायटी ( अध्यक्ष–१९५५ ), गॉनव्हिल व कायस महाविद्यालय (१९७६) यांचे फेलो; आंतरराष्ट्रीय संख्याशास्त्रीय संस्था, अमेरिकन अॅकॅडेमी ऑफ आर्ट्स अँड सायन्सेस ( १९५६ ), अमेरिकन इकॉनॉमिक अॅसोसिएशन ( १९७६ ), ब्रिटिश अॅकॅडेमी ( १९५६ ) यांचे सदस्य व रॉयल इकॉनॉमिक अॅसोसिएशनचे अध्यक्ष ( १९७८–८० ) होण्याचा मान त्यांना मिळाला असून ओस्लो व ब्रुसेल्स (१९६५), जिनिव्हा ( १९७१ ), वार्विक ( १९७५ ), पॅरिस ( १९७७ ), ब्रिस्टॉल ( १९७८ ) वगैरे विद्यापीठांनी सन्माननीय पदव्या आणि शासनाने नाईट व सी. बी. ई. म्हणजे कमांडर ऑफ ( द ऑर्डर ऑफ ) द ब्रिटिश एंपायर हे मानाचे किताब त्यांना दिले आहेत.

जगातील अनेक प्रसिद्ध नियतकालिकांमधून त्यांचे असंख्य लेख प्रसिद्ध झाले असून त्यांनी लिहिलेल्या पुढील पुस्तकांवरून त्यांच्या कार्याचा प्रचंड व्याप लक्षात येऊ शकेल : 'द रोल ऑफ मेझरमेंट इन इकॉनॉमिक्स' ( १९५१ ), 'द मेझरमेंट ऑफ कंझ्युमर्स एक्स्पेंडिचर अँड बिहेव्हियर इन युनायटेड








किंग्डम्–१९२०–३८', खंड– १ (इतरांसह १९५४) व खंड–२ ( डी. ए. रोवे यांच्या बरोबर, १९६६ ), 'क्वांटिटी अँड प्राइस इंडेक्सेस इन नॅशनल अकाउंट्स' (१९५६), 'सोशल अकाउंटिंग अँड इकॉनॉमिक मॉडेल्स' ( जिओव्हान्ना क्राफ्ट-मरे यांच्या बरोबर, १९५९ ), 'इन–पुट, आउट–पुट अँड नॅशनल अकाउंट्स' (१९६१), 'नॅशनल इन्कम अँड एक्स्पेंडिचर' ( जिओव्हान्ना स्टोन यांच्याबरोबर, १९६१), 'ए प्रोग्रॅम फॉर ग्रोथ' ( प्रमुख संपादक, १९६२–७४), 'मॅथेमॅटिक्स इन द सोशल सायन्सेस अँड अदर एसेज्' (१९६६), 'मॅथेमॅटिकल मॉडेल बिल्डिंग' (१९७१), 'आस्पेक्ट्स ऑफ इकॉनॉमिक अँड सोशल मॉडेलिंग' (१९८०).

स्टोन हे उंच, सडसडीत, मृदुभाषी, सभ्य व विनयशील गृहस्थ आहेत. पुस्तकांत रमणे हा त्यांचा छंद असून त्यांच्या खाजगी संग्रहातील पुस्तकांची संख्या १० हजारांच्या पुढे गेली आहे. आर्थिक संख्याशास्त्र हा त्यांना मनापासून आवडणारा विषय असून राष्ट्रीय उत्पन्न व संपत्ती यांचे मोजमाप करण्यात त्यांची हयात गेली आहे. ही मोजमापे व्यवस्थित रूपात कशी मांडता येतील याचा ते नेहमीच प्रयत्न करतात. त्यांचे कार्य एवढे प्रचंड असले, तरीही कामामधील शिस्तीला व टापटिपीला ते विशेष महत्त्व देतात.

राष्ट्रीय जमाखर्चामध्ये पद्धतिशास्त्राला अतिशय महत्त्व असते. महिना, तीन महिने, वर्ष अशा ठरावीक कालावधीत होणाऱ्या आर्थिक घडामोडी म्हणजे खरेदीदार व विक्रेते यांच्यामध्ये होणारे अब्जावधी व्यवहार होत, असे म्हणता येईल. अशा प्रकारे राष्ट्र हा आर्थिक घटक म्हणून गृहीत धरला, तर देशातील अत्यंत गुंतागुंतीच्या अशा आर्थिक व्यवहारांचे तपशीलवार सर्वेक्षण व विश्लेषण करावे लागेल. अशा व्यवहारांमध्ये अधिक सूक्ष्म पातळीवर असणाऱ्या गुंतागुंतीला मर्यादा नसते. म्हणून अशा आर्थिक घडामोडी संक्षिप्त रूपात मांडणे व त्यांचे एकत्रीकरण करणे यांसाठी पद्धती शोधून काढणे आवश्यक असते. अशा तऱ्हेने राष्ट्राची आर्थिक स्थिती सुलभपणे समजण्यासाठी आणि आर्थिक चित्र स्पष्ट करण्यासाठी राष्ट्रीय जमाखर्चाची पद्धती उपयुक्त ठरते.

राष्ट्राच्या जमाखर्चाच्या (किंवा हिशेबाच्या) पद्धतिशास्त्राची सुरुवात अशा प्रकारच्या गरजेतून झाली. याची उपयुक्तता व महत्त्व समजून घेण्यासाठी यातील पद्धतीच्या उदयाचा इतिहास जाणून घेतला पाहिजे. राष्ट्र ही कल्पना उदयास आली तेव्हापासून समाजशास्त्रज्ञ व राजकीय नेत्यांना राष्ट्राच्या एकूण उत्पादनाचे मापन करण्यात रस वाटू लागला. मात्र त्या काळी माहिती अपूर्ण असे. विसाव्या शतकात राष्ट्रीय उत्पन्न व उत्पादन यासंबंधीच्या आकडेवारीच्या संबंधात कोलीन क्लार्क ( ब्रिटन ), सायमन कुझनेट्स (अमेरिका), रागनार फ्रिश ( नॉर्वे ) , व्हान क्लीफ इत्यादींनी पायाभूत कार्य केले आहे. यामुळे देशाचे आर्थिक धोरण ठरविताना असलेले या आकडेवारीचे महत्त्व लक्षात आले. आर्थिक नियोजनात विविध आर्थिक बाबींची ( उदाहरणार्थ, राष्ट्रीय उत्पन्न ) तपशीलवार माहिती आवश्यक असते व त्यासाठी विश्लेषणाची गरज असते. अशा विश्लेषणाचे नवीन तंत्र दुसऱ्या महायुद्धाच्या काळात प्रचारात आले व मुख्यतः ब्रिटनमध्ये याचा वापर करून घेण्यात आला. तेथे जॉन मेनार्ड कीन्स यांनी याला चालना दिली. त्या वेळी ते युद्धविषयक अर्थकारणाच्या प्रश्नांसंबंधीचे कोषागार (ट्रेझरी) तज्ज्ञ म्हणून काम करीत होते. पुरवठ्याच्या बाजूकडील एकूण साधनसंपत्ती (खरे स्थूल राष्ट्रीय उत्पन्न, आणि मागणीच्या बाजूकडील युद्धतंत्रावरील एकूण व्यय, गुंतवणूक आणि बटवडा (उदाहरणार्थ वेतन) यांमध्ये समतोल साधण्यापासून या कार्याला कीन्स यांनी सुरुवात केली.

या कामामध्ये कीन्स यांना जेम्स मीड (१९७७ सालचे अर्थशास्त्राचे नोबेल पारितोषिक विजेते) व रिचर्ड स्टोन हे दोघे मदत करीत होते. ब्रिटनच्या राष्ट्रीय अर्थव्यवस्थेतील असमतोलांचे विश्लेषण करण्यासाठी कीन्स यांना प्रचंड प्रमाणावर आकडेवारी (संख्याशास्त्रीय माहिती) लागत असे आणि या आकडेवारीचे संकलन, संस्करण व पद्धतशीर मांडणी (वर्गीकरण) करण्याचे काम त्यांच्या या दोघा मदतनिसांकडे होते. अशा प्रकारे युद्धकालीन तंग आर्थिक परिस्थिती व कीन्स यांचा व्यक्तिगत प्रभाव यांतून या विश्लेषणाच्या तंत्राचा उदय झाला। यालाच राष्ट्रीय जमाखर्च किंवा सामाजिक जमाखर्च





अनुक्रमणिका

(लेखापालन) संबोधिण्यात येऊ लागले. अशा प्रकारे युद्धकालीन परिस्थितीचा अभ्यास करून ब्रिटिश अर्थव्यवस्थेची रूपरेषा दर्शविण्याकरिता प्रचंड प्रमाणावर आकडेवारी गोळा करण्यात आली. अंदाजपत्रकासाठी लागणाऱ्या या प्रचंड माहितीवर संस्करण करण्याचे ते प्रयोग पाहून कीन्स म्हणाले होते, " आकडेवारीतून मिळणाऱ्या आनंदाच्या एका नव्या युगात आपण पदार्पण केलें आहे. "

स्टोन यांना राष्ट्रीय उत्पन्नाचे विश्लेषण करण्यात विशेष रस असून राष्ट्रीय जमाखर्चाच्या विविध पद्धतींचा पाया मजबूत करण्याचें काम त्यांनी केले. या पद्धतींमागे त्यांचीच प्रेरणा असून त्यांनीच त्या प्रथम वापरून पाहिल्या. ब्रिटनमध्ये त्या काळात असलेल्या आर्थिक असमतोलाचे विश्लेषण करणे आणि त्यावर आर्थिक व राजकीय उपाय सुचविणे या दृष्टींनी या पद्धती आधारभूत ठरल्या. देशाची आर्थिक स्थिती व त्याच्या आर्थिक विकासाची तऱ्हा (वा आकृतिबंध) पद्धतशीरपणे दर्शविण्यासाठी राष्ट्रीय जमाखर्च सादर करणे, ही गोष्ट आता स्वाभाविक व आवश्यक मानली जाते. अशा जमाखर्चात विविध प्रकारच्या आर्थिक क्षेत्रांमध्ये परस्परसंतुलन साधण्यासाठी केलेली विपुल आकडेमोड दिलेली असते. १९५० नंतर विविध प्रकारचे विपुल तपशील असणारे अनेक देशांचे जमाखर्च उपलब्ध होऊ लागले (उदाहरणार्थ, ' ए सिस्टिम फॉर नॅशनल अकाउंट्स ' या संयुक्त राष्ट्रांच्या तसेच जागतिक बँकेच्या प्रकाशनांमधून उपलब्ध होऊ लागले); परंतु १९४०–५० या दशकामध्ये अशा तऱ्हेचे तर्कशुद्धपणे मांडलेले व विश्लेषणात्मक राष्ट्रीय जमाखर्च ही एक युगप्रवर्तक नवीन कल्पना होती. पुढे हीच कल्पना पद्धतिशास्त्रातील एक आश्चर्यकारक व महत्त्वाचा शोध ठरला आणि यातील महत्त्वपूर्ण प्रगतीला मुख्यत्वे स्टोन यांचे कार्य कारणीभूत ठरले.

राष्ट्रीय जमाखर्चाच्या आराखड्याचा विचार करताना स्टोन यांनी मुळात देशाच्या विविध आर्थिक उपक्षेत्रांच्या जमाखर्चाचे एकत्रीकरण करण्यावर लक्ष केंद्रित केले होते. याविषयीच्या कल्पना दुसऱ्या महायुद्धाच्या काळातच त्यांच्या मनात घोळत होत्या व तेव्हा ब्रिटनच्या संदर्भात त्यांना पद्धतशीर रूप देण्याचे मौलिक कार्य त्यांनी केले. या सर्व उपक्षेत्रांद्वारे होणारा देशातील साधनसंपत्तीचा एकूण वापर विचारात घेतला होता. जमाखर्चाच्या एका बाजूला येणारी महसुलाची वा खर्चाची प्रत्येक बाब ही दुसऱ्या बाजूला अनुक्रमे खर्च अथवा महसूल म्हणून आली पाहिजे, अशी जमाखर्चाची पद्धती त्यांनी स्वीकारली. या दुहेरी जमाखर्चाच्या परिपूर्ण पद्धतीमुळे अर्थव्यवस्थेतील एकमेकींवर अवलंबून असणाऱ्या बाबींचे आणि त्यांतील परस्परक्रियांचे चित्र स्पष्ट होऊ शकले. अशा प्रकारे या पद्धतीत कौटुंबिक उत्पन्न व खर्च, औद्योगिक क्षेत्रातील बटवडा (वाटप) व राष्ट्रीय बचत आणि गुंतवणुकीवरील महसूल, सार्वजनिक क्षेत्रातील खर्च व महसूल आणि शेवटी परदेशी व्यापाराचा समतोल या बाबींचे चित्र स्पष्ट होते. या दुहेरी नोंद करण्याच्या जमाखर्चाच्या (लेखापालनाच्या) पद्धतीमुळे अशा असंख्य प्रकारच्या व्यवहारांतील आकड्यांची परस्परपडताळणी करून पाहण्याचे साधन उपलब्ध झाले, ही अतिशय महत्त्वाची गोष्ट आहे. यामुळे निरनिराळ्या ठिकाणांहून येणाऱ्या आकडेवारीत मेळ असणे आवश्यक झाले. अशा तऱ्हेच्या राष्ट्रीय जमाखर्चाच्या गरजांची पूर्ती करण्यासाठी स्टोन यांना विस्तृत प्रमाणावर संख्याशास्त्रीय संशोधन करावे लागले.

ब्रिटनकरिता असलेल्या स्टोन यांच्या या संशोधन कार्यालाच पुढे व्यापक रूप प्राप्त झाले व त्यातून आंतरराष्ट्रीय स्तरावर लागू पडतील अशा पद्धती उपलब्ध झाल्या. दुसऱ्या महायुद्धानंतर लगेचच स्टोन यांनी संयुक्तराष्ट्रांच्या (मुळात राष्ट्रसंघाच्या) अखत्यारीतील एका गटाचे नेतृत्व स्वीकारले. इतर देशांना म्हणजे आंतरराष्ट्रीय स्तरावर वापरता येऊ शकेल अशी राष्ट्रीय जमाखर्चाची नमुनेदार व प्रमाणभूत पद्धती विकसित करणे हे या गटाचे काम होते. या कामी ' केंब्रिज ग्रोथ मॉडेल ' या नावाने ओळखली जाणारी व स्टोन यांनी विकसित केलेली राष्ट्रीय जमाखर्चासाठीची प्रतिकृती (नमुना) व्यापक अशा आंतरराष्ट्रीय स्तरावरही उपयुक्त ठरली. औद्योगिक दृष्ट्या प्रगत असलेल्या अनेक देशांच्या राष्ट्रीय जमाखर्चाच्या पद्धतीवर या प्रतिकृतीचा प्रभाव पडणे साहजिकच होते. परिणामी अनेक देशांतील आर्थिक व्यवहारांचा दर्जा व आर्थिक जडणघडण यांची आकडेवारीच्या दृष्टीने तुलना करण्यासाठी



अनुक्रमणिका

एक सामाईक आधारभूत पद्धती उपलब्ध झाली. अशा तऱ्हेने तुलना करता येण्यासारखी आकडेवारी उपलब्ध झाल्याने आंतरराष्ट्रीय संघटनांचा (उदा., संयुक्तराष्ट्रांच्या विविध घटक संघटना) मोठा फायदा झाला. ज्या देशांविषयीची आकडेवारी अपूर्ण असते व जी विश्वासार्हही नसते, त्या देशांच्या बाबतीत ही पद्धती योग्य म्हणता येणार नाही, असे काही अर्थतज्ज्ञांचे म्हणणे आहे. तथापि आता ही पद्धती सर्वत्र म्हणजे १०० हून अधिक विकसनशील देशांतही वापरली जात आहे. स्टोन यांना विकसनशील देशांच्या प्रश्नांविषयी विशेष आस्था आहे. भारतातील नियोजनाच्या प्रयोगाच्या आधीच्या काळात पंडित नेहरूंनी स्टोन यांना सल्ला देण्यासाठी पाचारण केले होते.

कुटुंब, उद्योगधंदे, सार्वजनिक क्षेत्र व परदेश यांच्यामधील परस्परव्यवहार हे स्टोन यांनी विचारात घेतलेले आहेत. हे व्यवहार सामान्यत: दुहेरी स्वरूपाचे असतात. म्हणजे एकाचा खर्च हा दुसऱ्याचे उत्पन्न असते. म्हणजे परस्परावलंबित्व हे या पद्धतीचे अंगभूत असे आगळेपण म्हणता येईल. दुहेरी-नोंद जमाखर्चाच्या पद्धतीमधील असंख्य व्यवहार एखाद्या क्षेत्राने (घटकाने) योग्य अशा सारांशरूप हिशेबात कसे व किती प्रमाणात परस्परांशी जुळवायचे व एकत्रित करायचे आणि त्यांच्याशी जुळणारे जमाखर्च कसे सादर करायचे हा एक अवघड व निर्णायक प्रश्न होता. या संदर्भात साध्या ठोकळेबाज लेखापालन पद्धतीचा विचार करून चालता येण्यासारखे नाही, असे स्टोन यांचे मत होते. स्टोन यांच्या पद्धतीला सैद्धांतिक विचारांची बैठक आहे व त्यामुळे आर्थिक विश्लेषण करणे, आर्थिक अंदाज बांधणे व आर्थिक धोरण ठरविणे या कामांना व्यवस्थित आधार उपलब्ध झाला आहे.

राष्ट्रीय जमाखर्चाच्या गरजांना आधारभूत ठरणारी पद्धतशीर संख्याशास्त्रीय माहिती (आकडेवारी) मिळविण्याचे मार्ग शोधून काढणे, दुहेरी-नोंद लेखापालन पद्धतीद्वारे ताडून पाहून या आकडेवारीत सुधारणा करणे आणि उपलब्ध प्रचंड नमुना आकड्यांच्या आसन्नीकरणाच्या पद्धती शोधून काढणे, या कामांवर स्टोन यांनी प्रभुत्व मिळविले आहे.

राष्ट्राच्या आर्थिक समतोलाविषयीच्या प्रश्नांचे सैद्धांतिक विश्लेषण करणे, हा स्टोन यांचा राष्ट्रीय जमाखर्च पद्धतीमागील मूळ उद्देश होता. कीन्स यांच्या विचारांमुळे आर्थिक विचारधारेत क्रांती घडून आली व तीमुळे राष्ट्रीय जमाखर्चाच्या पद्धतींच्या विकासाला मुळात चालना मिळाली. मात्र असे असले तरी या पद्धतींकडे आज मूलतत्त्वांच्या व विचारप्रणालीच्या दृष्टीने पाहिल्यास त्या 'प्रभावशून्य' मानता येतील. अर्थशास्त्रात आढळणारे विश्लेषणविषयक सर्व मतप्रवाह व सर्व प्रकारचे देश या पद्धती वापरतात. अशा प्रकारे राष्ट्रीय जमाखर्चाद्वारा विविध प्रकारच्या अनेक आर्थिक विश्लेषणांसाठी पद्धतशीर प्रदत्ताचा (आकडेवारीचा) आधार मिळतो. आर्थिक व्यवहारांच्या दर्जाचे विश्लेषण, चलनवाढीचे विश्लेषण, आर्थिक जडणघडणीचे विश्लेषण व विकासाचे विश्लेषण यांचा या विश्लेषणांमध्ये अंतर्भाव असून विशेषत: या विश्लेषणांच्या संदर्भात देशादेशांमधील आंतरराष्ट्रीय तुलना करण्यासाठी आधारभूत आकडेवारी यांतून उपलब्ध होते.

स्टोन यांनी अर्थशास्त्रातील इतर क्षेत्रांतही महत्त्वाचे संशोधन केले आहे (उदाहरणार्थ, आर्थिक विकास, ग्राहकांच्या मागणीचे अंदाज वगैरे). असे असले तरी राष्ट्रीय जमाखर्चाच्या पद्धतींच्या विकासात त्यांनी घेतलेला पुढाकार व त्यासाठी केलेले मूलभूत स्वरूपाचे मार्गदर्शक संशोधन हेच त्यांचे अर्थशास्त्रातील मुख्य कार्य आहे. त्यांनी विकसित केलेले हे तंत्र वर उल्लेखिलेल्या क्षेत्रांमध्ये अतिशय फायदेशीर ठरले आहे. १९५० नंतर राष्ट्रीय जमाखर्चाच्या पद्धतींचा जगभर विलक्षण प्रभाव पडला आहे व आर्थिक दर्जा व जडणघडण यांचे विश्लेषण करण्यासाठी या पद्धती अपरिहार्य ठरल्या आहेत. शिवाय याचबरोबर राष्ट्रांच्या अंदाजपत्रकांच्या रूपामधील आगाऊ अंदाज बांधण्याला त्यांची मदत होते.

राष्ट्रीय जमाखर्चाप्रमाणेच 'सामाजिक लेखापालन' या संकल्पनेशीही स्टोन यांचे नाव जोडले जाते. राष्ट्रीय जमाखर्चात उत्पन्न, बचत व गुंतवणूक यांसारख्या बाबींचे तपशीलवार विवरण असते. मात्र हे महत्त्वाचे असले, तरी गुंतागुंतीची

अनुक्रमणिका

अर्थव्यवस्था समजून घेण्यासाठी लागणारी सर्वच माहिती यातून मिळत नाही. यासाठी पुढील दोन प्रकारची कोष्टकरूप माहिती पूरक ठरते : १) विविध उत्पादनक्षेत्रांमधील वस्तूंचे ( विनिमय ) प्रवाह विशद करणारी आदान-प्रदान कोष्टके व २) वित्त-व्यवस्थेच्या मूलस्रोतांचे चित्र रेखाटणारी निधी-ओघ-कोष्टके. ही कोष्टकरूप माहिती व राष्ट्रीय जमाखर्च या तीन बाबींच्या एकीकरणाशी ‘ सामाजिक लेखापालना'चा संबंध येतो. याच्या विकासातील स्टोन व त्यांच्या सहकाऱ्यांचा वाटा मोठा असून अलीकडच्या काळात या लेखापालनाच्या संकल्पनेत प्रादेशिक व लोकसंख्याशास्त्रीय दृष्टी आणण्याच्या दृष्टीने ते प्रयत्न करीत आहेत.

धोरणविषयक निर्णय घेऊन प्रसिद्धीच्या झोतात वावरण्यामध्ये स्टोन यांना विशेष रुची नाही; त्यांना ग्रंथालयात रमायला आवडते. म्हणून ते म्हणतात, “ देशाच्या आर्थिक धोरणाविषयी बोलणारे शास्त्रज्ञ हे लोकांच्या नजरेत भरतात; ते माझ्याप्रमाणे मागे राहून एकांतवास पत्करणारे नसतात.” स्टोन आपल्या विषयाचे काही प्रमाणात टीकाकारही आहेत. हल्ली बरेच शास्त्रज्ञ विशेषीकरणावर जादा प्रमाणात भर देतात व त्यामुळे त्यांना विषयाच्या इतिहासाची व लोकांच्या मनःस्थितीची पुरेशी माहिती नसते, असे स्टोन यांना वाटते. म्हणून ते म्हणतात, “ अर्थशास्त्रज्ञ शासनाला उपाय सुचवितात; मात्र त्यानुसार लोकांची बदलण्याची तयारी आहे किंवा नाही ते विचारात घेत नाहीत.”

## रसायनशास्त्र

या वर्षीचे रसायनशास्त्राचे नोबेल पारितोषिक रॉकफेलर ( न्यूयॉर्क ) विद्यापीठातील ( रॉबर्ट ) ब्रूस मेरीफील्ड या जीवरसायनशास्त्रज्ञांना देण्यात आले आहे. पेप्टाइडे व प्रथिने ही जीवनावश्यक रसायने असून ती कृत्रिम रीतीने निर्मिण्याची साधी व कल्पक पद्धती शोधून काढली म्हणून त्यांना हे पारितोषिक देण्यात आले आहे. या वर्षीचे ते एकमेव अमेरिकन नोबेल पारितोषिक विजेते असले, तरी त्यांच्या विद्यापीठाशी निगडित असलेले ते १९ वे नोबेल पारितोषिक विजेते आहेत. पेप्टाइडे व प्रथिने यांच्याशी संबंधित असलेले रसायनशास्त्राचे क्षेत्र हे मेरीफील्ड यांच्या आवडीचे क्षेत्र असून त्यामध्ये नवनवीन गोष्टी पुढे येण्याची शक्यता त्यांच्या या नव्या पद्धतीमुळे निर्माण झाली आहे. इतर शास्त्रज्ञ ही पद्धती इतर क्षेत्रांतही वापरू लागल्याने त्या क्षेत्रातही नवीन दिशेत प्रगती होण्याची शक्यता वाढली आहे. अशा तऱ्हेने एकूण कार्बनी रसायन-शास्त्रातील या पद्धतीच्या वापरामुळे जीवरसायन-शास्त्र, जनुक तंत्रविद्या, रेणवीय जीवविज्ञान, औषधिक्रियाविज्ञान, वैद्यक इत्यादी विषयांतील प्रगत संशोधनाला चांगलीच चालना मिळाली आहे. या पद्धतीमुळे संश्लेषणाला म्हणजे कृत्रिम रीतीने पदार्थ-निर्मितीला लागणाऱ्या कालावधीत खूपच बचत होते आणि पाहिजे असलेले द्रव्य जास्त प्रमाणात मिळविणे शक्य झाले आहे. औषधांची निर्मिती करणाऱ्या कंपन्या या तंत्राचा वापर करून लवकरच नवीन औषधे बनवू लागतील. त्यांमध्ये विविध रोगांवरच्या लसी तसेच मधुमेह, उच्च रक्तदाब, हृदयविकार, हॉर्मोन चिकित्सा यांसाठीची औषधे यांचा समावेश असेल. इन्शुलीनशी निगडित असलेले रेणू लवकरच बनविता येतील व ते मधुमेहावरील उपचारात दीर्घकालासाठी उपयुक्त ठरू शकतील, अशी आशा आहे. विशिष्ट जैव क्रियांसाठी लागणारी अधिक कार्यक्षम अशी नवीन एंझाइमे या तंत्राने संश्लेषित करता येऊ शकतील, असेही शास्त्रज्ञांना वाटते.

मेरीफील्ड यांचा जन्म अमेरिकेतील फोर्ट वर्थ (टेक्सस) येथे १५ जुलै १९२१ रोजी झाला. त्यांचे शिक्षण कॅलिफोर्निया विद्यापीठात झाले असून त्यांनी १९४९ साली त्या विद्यापीठाची पीएच्. डी. पदवी संपादन केली आहे. पार्क रिसर्च फाउंडेशनमध्ये रसायनशास्त्रज्ञ ( १९४३–४४ ), कॅलिफोर्निया विद्यापीठात शिक्षण सहायक ( १९४४–४७ ), तेथील मेडिकल स्कूलमध्ये संशोधन सहायक ( १९४८–४९ ) व रॉकफेलर विद्यापीठात सहायक अध्यापक (१९४९–६६) म्हणून त्यांनी काम केले असून १९६६ पासून ते रॉकफेलर विद्यापीठात जीवरसायन-शास्त्राचे प्राध्यापक आहेत. अमेरिकेच्या नॅशनल ॲकॅडेमी ऑफ सायन्सेसचे सदस्यत्व, नोबेल अभ्यागत प्राध्यापकपद ( १९६८ ) तसेच लास्कर ( १९६९ ), गार्डनर व इंटरसायन्स ( १९७० ), अमेरिकन केमिकल सोसायटी ( १९७२ ), निकोल्स (१९७३),








प्येअर ( १९७९ ) इत्यादी नावांनी ओळखण्यात येणारे पुरस्कार हे सन्मान त्यांना मिळाले आहेत. त्यांनी जगातील विविध वैज्ञानिक नियतकालिकांत दीडशेहून जास्त लेख लिहिले आहेत.

एलिझाबेथ फर्लांग यांच्याशी त्यांचा विवाह १९४९ साली झाला असून त्यांना सहा मुले आहेत टेनिस खेळणे, दऱ्याखोऱ्यांत भटकणे व उघड्यावर तंबू ठोकून राहणे हे त्यांचे छंद आहेत. ते जेव्हा प्रयोगशाळेत नसतात तेव्हा घरात व घराबाहेरच्या आवारात डागडुजी व साफसफाई करण्यात मग्न असतात. हे मृदुभाषी गृहस्थ काही काळ बालवीरांच्या चमूचे नेते होते. हे पारितोषिक मिळाल्यावर ते म्हणाले, " आता मी उरलेले आयुष्य दाताळयाने पाने गोळा करण्यात (आरामात) घालवू शकेन."

प्रथिने ही मूलभूत महत्त्व असलेली जीवनावश्यक रसायने आहेत व ती जिवंत पेशींकडून निर्माण केली जातात. ज्याप्रमाणे बावन्न मूळाक्षरे निरनिराळ्या प्रकारे एकमेकांना जोडली जाऊन, लहानमोठे शब्द व त्यांतून मराठी भाषा बनते, त्याचप्रमाणे अनेक ॲमिनो अम्ले एकमेकांना रासायनिक बंधांनी जोडली जाऊन लहानमोठ्या शृंखलांनी युक्त अशी प्रथिने बनतात. पेप्टाइडे ही ॲमिनो अम्लांचे गट वा समूह असून ती प्रथिनांचे घटक ( एकके ) असतात. सजीवातील अनेक क्रियाप्रक्रिया समजून घेण्यासाठी प्रथिनांमधील ॲमिनो अम्लांचा क्रम शोधून काढणे आवश्यक असते. संशोधनासाठी पेप्टाइडे बनवावी लागतात व ते करताना ॲमिनो अम्लांच्या अनुक्रमाची हुबेहूब नक्कल कशी करावी ते माहीत असावे लागते. मेरीफील्ड यांच्या या नव्या तंत्राचा शोध लागण्यापूर्वीही पेप्टाइडे बनवीत असत. मात्र हे काम अतिशय किचकट असे आहे. त्यामध्ये डझनावारी शुद्धीकरणाच्या कष्टप्रद क्रिया कराव्या लागतात व या तऱ्हेने पेप्टाइडांची शृंखला निर्मिण्यास कित्येक महिने किंवा अनेक वर्षेही लागतात.

सजीवात होत असणाऱ्या रासायनिक विक्रिया उत्स्फूर्तपणे म्हणजे आपोआप होत नसतात; तर त्या घडून येण्यासाठी प्रत्यक्ष विक्रियेत भाग न घेता त्यांना मदत करणाऱ्या पदार्थांची म्हणजे उत्प्रेरकांची गरज असते. असे उत्प्रेरक म्हणजे प्रथिने होत. प्रथिनांचे जैव संश्लेषण म्हणजे सजीवातील प्रथिनांची निर्मिती होय. या संश्लेषणातील पहिला टप्पा म्हणजे पेप्टाइड-रेणूची बांधणी हा होय. अशा जैव संश्लेषणात सुमारे वीस ॲमिनो अम्ले वापरली जातात व त्यांच्या स्थानांची अदलाबदल होऊन असंख्य पेप्टाइड-प्रकार निर्माण होऊ शकतात. विविध जैव प्रक्रियांचे नियंत्रण हार्मोने व इतर द्रव्यांकडून होत असते. ही द्रव्येही पेप्टाइडे असतात; मात्र त्यांच्यातील ॲमिनो अम्लांची संख्या प्रथिनांतील ॲमिनो अम्लांच्या संख्येहून कमी असते.

फ्रेडरिक सँगर ( १९५८ सालचे रसायनशास्त्राचे नोबेल पारितोषिक विजेते ), स्टॅनफर्ड मूर व विल्यम हॉवर्ड स्टाइन ( १९७२ चे रसायनशास्त्राचे नोबेल पारितोषिक विजेते ) आणि इतर शास्त्रज्ञांनी केलेल्या संशोधनामुळे पुष्कळ प्रथिनांची व पेप्टाइडांची रचना तपशीलवारपणे माहीत झाली. या संदर्भातील पेट एडमान या स्विडीश संशोधकाचे कार्यही महत्त्वाचे आहे; मात्र ते तरुणपणीच मृत्यू पावले. पेप्टाइडांची रचना ठरविण्याची स्वयंचलित पद्धती आता वैज्ञानिक क्षेत्रात रूढ झाली आहे. पेप्टाइडांचे संश्लेषण करणे हे कार्बनी रसायनशास्त्रातील महत्त्वाचे कार्य असून व्हिसेंट ड्यू व्हिग्नेऑड यांनी ऑक्सिटोसीन हे पेप्टाइड हॉर्मोन संश्लेषित करून प्रगतीचा एक महत्त्वाचा टप्पा गाठला. अशा संश्लेषणासाठी हल्ली वापरल्या जाणाऱ्या पद्धतीमागील सर्वसाधारण तत्त्व एमिल फिशर ( १९०२ चे रसायनशास्त्राचे नोबेल पारितोषिक विजेते ) यांनी फार पूर्वीच विकसित केले होते. १९५०-६० या दशकात पेप्टाइडांविषयीच्या रसायनशास्त्रीय अभ्यासात वाढ होत गेली. शक्तिशाली व महत्त्वपूर्ण अशा जैव क्रियांशी निगडित असणारी पेप्टाइडे अलग करण्यात येत होती. ही पेप्टाइडे प्रथिनांप्रमाणेच आल्फा ॲमिनो अम्लांच्या आखूड शृंखलांची बनलेली असल्याचे दिसून आले होते. या सरळ शृंखलांमधील ॲमिनो अम्लांचा नैसर्गिक क्रम लवकरच निश्चित करण्यात आला. या निश्चित क्रमाने शृंखलेमध्ये ॲमिनो अम्लांची जोडणी करण्याच्या तंत्राला पेप्टाइड संश्लेषण असे म्हणतात व हे तंत्र नंतरच्या काळात हळूहळू विकसित होत गेले. औषधे व संशोधनाकरिता






लागणाऱ्या पेप्टाइडांची मागणी प्रचंड वाढली मात्र त्या वेळच्या तंत्राद्वारे एवढा पुरवठा करता येणे शक्य नव्हते. कारण त्या वेळच्या द्रव प्रावस्था पद्धतीत अलगीकरण, शुद्धीकरण व विशिष्टीकरण या क्रिया कराव्या लागत व त्यांमध्ये खूप वेळ जात असे.

प्रत्येक ॲमिनो अम्लात अम्लधर्मी कार्बॉक्सिलिक गट (COOH) व क्षारधर्मी (बेसिक) ॲमिनो गट- ($NH_2$) हे दोन गट असतात. एका ॲमिनो अम्लातील ॲमिनो गटाची दुसऱ्यातील कार्बॉक्सिलिक गटाशी विशिष्ट परिस्थितीत विक्रिया होते व तिच्यातून निर्माण होणाऱ्या रासायनिक बंधामुळे डायपेप्टाइड बनते. या मिश्रणात डायपेप्टाइडाशिवाय विक्रिया न झालेली ॲमिनो अम्लेही असतात. पुढील टप्प्यातील प्रारंभिक द्रव्य म्हणून डायपेप्टाइड वापरायचे असते. म्हणून या मिश्रणातून ते अलग करून घ्यावे लागते. या विक्रियेचे नियंत्रण करण्यासाठी पहिल्या ॲमिनो अम्लातील कार्बॉक्सिलिक व दुसऱ्यातील ॲमिनो हे प्रत्यक्ष विक्रियेत सहभागी न होणारे गट सुरक्षित (संरक्षित) ठेवावे लागतात. डायपेप्टाइडमधील या दोन सुरक्षित गटांपैकी एक गट नंतर विवेचकपणे काढून टाकला व एक सुरक्षित गट असलेल्या तिसऱ्या ॲमिनो अम्लाशी त्याची विक्रिया घडवून आणली, तर ट्रायपेप्टाइड हे संयुग तयार होते. अशाच प्रकारे ही साखळी टप्प्याटप्प्याने पुढे वाढवीत नेता येते. द्रव प्रावस्था संश्लेषणाचा हा मार्ग सैद्धांतिक कल्पनेमध्ये साधा, सुटसुटीत वाटतो. तथापि प्रत्यक्ष प्रयोग करताना तो अतिशय अवघड ठरतो. कारण १९६३ सालापर्यंत या विक्रिया योग्य अशा विद्रावकांत घडवून आणाव्या लागत (म्हणून याला द्रव प्रावस्था संश्लेषण म्हणतात) आणि प्रत्येक टप्प्यात हवे असलेले द्रव्य इतर उपपदार्थ व विक्रिया न झालेले मूळ पदार्थ यांच्यापासून स्फटिकीभवनाने अलग करून घ्यावे लागते. नंतरच पुढील टप्पा सुरू करता येतो. अलगीकरणाच्या या क्रियेत हव्या असलेल्या पदार्थाचे प्रमाण कमीकमी होत जाणे अपरिहार्य असते. या पद्धतीने १०० ॲमिनो अम्लांचे बनलेले पेप्टाइड बनविणे किती अवघड व वेळखाऊ काम असेल, याची कल्पना यावरून येऊ शकेल. संश्लेषणाच्या प्रत्येक टप्प्यात ९० टक्के म्हणजे अतिशय चांगला उतारा मिळाला, तरी १०० टप्प्यांनंतर हव्या असलेल्या द्रव्याचा एकूण उतारा ०.००३ टक्का एवढाच येईल. म्हणजे शेवटी पुरेशा प्रमाणात पेप्टाइड मिळवायचे असेल, तर सुरुवातीचे द्रव्य फारच मोठ्या प्रमाणात घ्यावे लागेल, हे उघडच आहे. शिवाय हे संश्लेषणाचे काम अतिशय कंटाळवाणे व वेळ खाणारेही आहेच.

पहिले ॲमिनो अम्ल अविद्राव्य अशा बहुवारिक स्वरूपाच्या घन आधारद्रव्याला जोडले, तर पेप्टाइड अलग करणे सुलभ होईल व वेळही वाचेल, असे मेरीफील्ड यांच्या लक्षात आले. १९६० सालानंतर त्यांनी अतिशय कष्ट घेऊन पेप्टाइडांचे संश्लेषण करण्याची एक अतिशय सुटसुटीत व कल्पक पद्धती शोधून काढली. हिच्यात घन आधारद्रव्याचा वापर केला जात असल्याने या तंत्राला घन प्रावस्था संश्लेषण असे म्हटले जाते. ही प्रक्रिया एका पात्रात करता येते. पॉलिस्टायरीन या बहुवारिकाचा म्हणजे एका प्रकारच्या प्लॅस्टिकचा सूक्ष्म मणी आधारद्रव्य म्हणून वापरतात. हे घनरूप खास आधारद्रव्य अक्रिय असते म्हणजे ते विक्रियेत सहभागी होत नाही. अपेक्षित पेप्टाइडाच्या एका टोकाच्या (पहिल्या) ॲमिनो अम्लातील कार्बॉक्सिलिक गट या आधारद्रव्याला जोडतात. नंतर ॲमिनो अम्लांच्या एककांचे थेंब जादा प्रमाणात टाकीत जाऊन ही एकके योग्य क्रमाने एकापुढे एक जोडण्यात येतात. या प्रकारे पेप्टाइड रेणूची शृंखला विकसित होत जाते. संश्लेषणातील प्रत्येक टप्प्यानंतर मिळणारी शृंखला गाळून शुद्धिकारक विद्रावाने धुवून घेण्यात येते. त्यामुळे विक्रियेत तयार होणारे उपपदार्थ व विक्रिया न झालेले मूळ पदार्थ काढून टाकता येतात. यामुळे आधीच्या पद्धतीत अलगीकरणामुळे अपेक्षित पदार्थात होणारी घट टाळता येते. संश्लेषण पूर्ण झाल्यावर आधारद्रव्यापासून अम्लाच्या साहाय्याने पेप्टाइड वेगळे केले जाते. प्रत्येक टप्प्यात बनणारा मध्यस्थ पदार्थ अलग करण्याऐवजी साध्या धुण्याच्या क्रियेची गरज उरल्यामुळे वेळेची फारच बचत होते. शिवाय या नव्या पद्धतीमुळे प्रत्येक टप्प्याच्या अखेरीस मिळणारा उतारा ९९.५ किंवा यापेक्षा अधिक टक्क्यांपर्यंत वाढविता येऊ शकतो. परंपरागत पद्धतीत एवढा उतारा मिळणे शक्य

नाही. वरील उदाहरणात शेवटचा एकूण उतारा ०.००३ टक्का आला आहे; उलट या नव्या तंत्राने हा उतारा ६१ टक्क्यांपर्यंत येऊ शकतो. एवढेच नव्हे तर या पद्धतीतील बहुतेक क्रिया या स्वयंचलित रूपात वापरण्यास योग्य अशा यांत्रिक स्वरूपाच्या आहेत. त्यामुळेच मेरीफील्ड यांनी पहिले स्वयंचलित पेप्टाइड संश्लेषक उपकरण उभारले व त्यांना स्वयंचलित वाहन निर्मिणाऱ्या हेन्री फोर्डप्रमाणे कीर्ती लाभली. अशी अनेक उपकरणे आता बाजारात उपलब्ध झाली आहेत. शिवाय मेरीफील्ड यांच्या तंत्रात काही बदल (उदा., आधारद्रव्यात) करून संगणकाद्वारे नियंत्रण करता येऊ शकतील अशा प्रकारचे उपकरणांचे नमुने बनविण्यात यश मिळविण्यात आले आहे. १९६४ सालानंतर या तंत्राचे फायदे व मर्यादा लक्षात येत जाऊन नंतरच्या दहा वर्षांमध्ये हे एक उपयुक्त तंत्र म्हणून प्रस्थापित झाले.

मेरीफील्ड यांच्या नावाने ओळखण्यात येणाऱ्या या नव्या पद्धतीमुळे पेप्टाइडे व प्रथिने यांच्या रसायनशास्त्रीय अभ्यासात क्रांतीच घडून आली आहे. पेप्टाइडांचे अनेक उपयोग होऊ शकतात व या पद्धतीने आता हजारो प्रकारची पेप्टाइडे (तसेच न्यूक्लिइक अम्ले) संश्लेषित केली जातात व त्यांचे मोठ्या प्रमाणात उत्पादन करणे शक्य झाले आहे. २१ व ३० ॲमिनो अम्लांच्या दोन पेप्टाइड शृंखला असलेले छोटे प्रथिन म्हणजे इन्शुलीन असून ते १९६३ साली जर्मनी, अमेरिका व चीनमध्ये संश्लेषित करण्यात आले; तर १९६५ साली हाच रेणू स्वयंचलित घन प्रावस्था पेप्टाइड संश्लेषक उपकरण वापरून मेरीफील्ड यांच्या प्रयोगशाळेत बनविण्यात आला होता. मेरीफील्ड व त्यांच्या सहकाऱ्यांनी 'रिबोन्युक्लिएज-ए' या नावाच्या क्रियाशील एंझाइमाचेही संश्लेषण केले व यामुळे या तंत्राच्या प्रगतीतील एक अतिशय महत्त्वाचा टप्पा गाठला गेला. कारण हे एक अत्यंत गुंतागुंतीचे पेप्टाइड आहे व डीऑक्सिरिबोन्यूक्लिइक (डी एन ए) नावाच्या न्यूक्लिइक अम्लातील आनुवंशिक माहितीचा उलगडा करण्यासाठी पेशींना या एंझाइमाची गरज असते. घनरूप आधारद्रव्याला जोडलेल्या संयुगापासून सुरुवात करून अनेक टप्प्यांनी संश्लेषण करण्याची मेरीफील्ड यांची ही कल्पना जगातील शेकडो प्रयोगशाळांतून तसेच कार्बनी रसायनशास्त्रातील बहुतेक इतर क्षेत्रांतही वापरली जात आहे. ऑलिगोन्यूक्लिओटाइडांचे संश्लेषण हे यांमधील सर्वांत महत्त्वाचे क्षेत्र आहे. यामध्ये हे तंत्र १९७७ च्या सुमारास यशस्वीपणे वापरण्यात आले. संकरित डीएनए संशोधनात ऑलिगोन्यूक्लिटाइडे ही संयुगे आवश्यक असतात. यासाठीही संगणकाकडून नियंत्रण होणारे स्वयंचलित उपकरण बनविण्यात आले आहे. यांशिवाय प्रथिनांच्या क्रमवारीविश्लेषणासाठीही या तंत्रावर आधारलेल्या पद्धती विकसित करण्यात आल्या आहेत. अशा तऱ्हेने आनुवंशिक अभियांत्रिकी (जेनेटिक एंजिनिअरिंग) या विषयातील संशोधनावर या तंत्राचा परिणाम झाला आहे.

रॉकफेलर विद्यापीठात फ्लेक्सनर हॉल नावाचा एक भाग आहे. त्यात असलेल्या लिफ्टमध्ये (इलेव्हेटरमध्ये) हस्ताक्षरातील एक पाटी आहे. "घन प्रावस्था पेप्टाइड संश्लेषणाचा जन्म येथे झाला", असे तीवर अभिमानाने लिहिलेले आहे. २५ वर्षांपूर्वी मेरीफील्ड मित्रांसमवेत या लिफ्टमधून चवथ्या मजल्यावर चालले होते व त्या वेळी त्यांना या तंत्रामागील कल्पना सुचली होती. १९८४ साली ऑक्टोबरच्या तिसऱ्या आठवड्यात याच लिफ्टमधून ते बाहेर पडले तेव्हा त्यांना त्यांच्या प्रयोगशाळेतील कर्मचाऱ्याने मिठीच मारली आणि त्या लिफ्टमध्ये सुचलेल्या कल्पनेसाठी त्यांना नोबेल पारितोषिक मिळाल्याची बातमी त्याने सांगितली. संश्लेषणाचे त्यांचे हे तंत्र १९५५-६० या काळात विकसित झाले; १९६०-७० या दशकात ते वापरात आले आणि १९७०-८० या दशकात प्रयोगशाळेत वापरता येणारे एक मूलभूत साधन म्हणून ते प्रस्थापित झाले, असे नोबेल पारितोषिक देणाऱ्या स्विडीश रॉयल ॲकॅडेमीचे प्रा. बेंग्ट लिंडबर्ग पारितोषिक जाहीर करताना म्हणाले होते.

## भौतिकी

कार्लो रुबिया हे शास्त्रज्ञ टॅक्सीमधून लिनाते विमानतळाकडे निघाले होते. हवाई वाहतूक नियंत्रकांच्या संभाव्य संपामुळे ते काहीसे अस्वस्थ झालेले होते. टॅक्सीतील पॉप संगीत अचानक बंद झाले व बातम्या सुरू झाल्या. कार्लो रुबिया व व्हान डर मेर यांना १९८४ सालचे भौतिकीचे



नोबेल पारितोषिक देण्यात आल्याचे बातम्यांत सांगण्यात आले. ही बातमी ऐकून रुबिया उत्तेजित झाले व बातमीतील रुबिया आपणच आहोत, असे त्यांनी टॅक्सी ड्रायव्हरला सांगितले. प्रथम त्याचा यावर विश्वास बसला नाही. मात्र खात्री पटल्यावर रुबिया यांच्याकडून टॅक्सीचे भाडे न घेऊन त्याने आपला आनंद व्यक्त केला. या उत्साही शास्त्रज्ञाला ही बातमी चालत्या वाहनात समजली, हे उचितच झाले. कारण ते हार्व्हर्ड विद्यापीठात भौतिकीचे प्राध्यापक म्हणूनही काम करीत असल्याने वरचेवर विमानप्रवास करीत असतात. त्यामुळे मित्र त्यांना गमतीने, 'अलितालिया (इटालियन विमान वाहतूक कंपनी) शास्त्रज्ञ' म्हणतात.

कार्लो रुबिया व सायमन व्हान डर मेर हे दोघे जिनिव्हा येथील यूरोपीयन अणुकेंद्रीय संशोधन संघटनेच्या म्हणजे CERN या नावाने ओळखल्या जाणाऱ्या संस्थेच्या एका मोठ्या प्रकल्पात काम करीत असून येथील संशोधनकार्याला प्रथमच नोबेल पारितोषिकाचा बहुमान मिळाला आहे. विश्वात चार मूलभूत प्रेरणा (वा प्रेरणाक्षेत्रे) आहेत असे मानण्यात येते. त्यांपैकी दुर्बल अणुकेंद्रीय प्रेरणा (किंवा आंतरक्रिया) ही एक आहे. या प्रेरणेचे प्रेषण वा संक्रमण हे W व Z या अक्षरांनी दर्शविल्या जाणाऱ्या (क्षेत्रीय) जड मूलकरणांद्वारे (म्हणजे अणूपेक्षाही लहान कणांद्वारे) होत असते, असे मानतात. (किरणोत्सर्ग, बीटा कणांचा क्षय किंवा सूर्यावरील शक्तिनियंत्रक अणुकेंद्रीय प्रक्रिया ही या दुर्बल प्रेरणेची उदाहरणे होत). या W व Z या मूलकणांचा शोध लावण्याच्या कामी या दोघांनी निर्णायक स्वरूपाची महत्त्वपूर्ण कामगिरी केली असून तीबद्दलच त्यांना हे पारितोषिक देण्यात आले आहे. रॉयल स्विडीश ॲकॅडेमीतील भौतिकीविदांच्या मते हा शोध म्हणजे गेल्या पन्नास वर्षांत दुर्बल अणुकेंद्रीय प्रेरणेविषयी झालेल्या संशोधनाचा तसेच CERNच्या प्रकल्पातील शोधमालिकांचा कळस होय. तर CERNच्या अध्यक्षांच्या मते ट्रँझिस्टरच्या शोधानंतरचा हा सर्वांत महत्त्वाचा शोध आहे.

या शोधामुळे प्रेरणांविषयीचा तथाकथित एकीकृत सिद्धांत सिद्ध करण्याच्या प्रयत्नांमधील एक महत्त्वाचा टप्पा गाठला गेला आहे, असे म्हणता येईल. या सिद्धांताद्वारे निसर्गातील चार मूलभूत चालक प्रेरणांची गुंफण एका संचात करायची आहे. यांच्यापैकी दोन प्रेरणा परिचित आहेत. त्या म्हणजे विद्युत चुंबकीय (विजेचा दिवा लावण्यासाठी वापरली जाणारी) व गुरुत्वीय (माणसाला पृथ्वीवर जखडून ठेवणारी व आकाशातील गोलांच्या एकमेकांभोवतीच्या कक्षा निश्चित करणारी) या प्रेरणा होत. दुसऱ्या दोन प्रेरणा तेवढ्या परिचित नाहीत. अणुकेंद्रातील मूलकणांना एकत्र बांधून ठेवणारी तथाकथित प्रबळ अणुकेंद्रीय प्रेरणा व किरणोत्सर्गाचे नियमन करणारी दुर्बल अणुकेंद्रीय प्रेरणा या त्या अपरिचित प्रेरणा होत. या प्रत्येक प्रेरणेचे कार्य (प्रेषण, संक्रमण) किंवा आंतरक्रिया विशिष्ट मूलकणांच्या देवाणघेवाणीतून चालते व या मूलकणाला त्या प्रेरणेचा 'वाहक' म्हणतात. उदाहरणार्थ, फोटॉन हा प्रकाशाचा अंतिम पुंज हा विद्युत चुंबकीय प्रेरणेचा, तर W व Z हे मूलकण दुर्बल प्रेरणेचे वाहक आहेत. या प्रेरणांची संख्या कमी करून एकीकृत सिद्धांताची पूर्तता करता येऊ शकेल. उदाहरणार्थ, विद्युत चुंबकी व दुर्बल या प्रेरणा संयुक्त (म्हणजे विद्युत-दुर्बल) आहेत अशी, मीमांसा शेल्डन ग्लॅशो, अब्दुस सलाम व स्टीव्हन वीनबर्ग या तिघांनी मांडली व त्यांना त्याकरिता १९७९ साली भौतिकीचे नोबेल पारितोषिक मिळाले. या दोन प्रेरणा एका मूलभूत महाप्रेरणेची भिन्न अशी प्रकटीकरणे (रूपे) असून विश्वाची उत्पत्ती झाल्यावर या प्रकटीकरणांमध्ये महाप्रेरणा विभक्त झाल्याचे मानतात. या सिद्धांताने प्रत्यक्ष प्रक्रियेत येणाऱ्या काही अडचणींचा उलगडा तर झालाच; शिवाय त्यामुळे दुर्बल व विद्युत चुंबकीय या प्रेरणांचे एकीकरण असल्याचे दिसून आले. या सिद्धांतामध्ये $W^+$ व $W^-$ या दोन जड विद्युतभारित मूलकणांशिवाय फोटॉन व $Z^0$ हे दोन विद्युतभाररहित मूलकणही गृहीत धरण्यात आले. म्हणून हा सिद्धांत प्रस्थापित करण्यासाठी $W^+$, $W^-$ व $Z^0$ या अतिशय जड (स्ट्राँशियम या मूलद्रव्याच्या अणूकेंद्राएवढ्या जड) मूलकणांचे

अनुक्रमणिका






अस्तित्व सिद्ध होणे आवश्यक होते. या तीन मूलकणांचा छडा लावण्याचे रुबिया यांनी ठरविले होते.

न्यूट्रॉनाचे प्रोटॉनात रूपांतर होताना इलेक्ट्रॉन-न्यूट्रिनो ही जोडी सरळ निर्माण होते, असा १९३४ साली समज होता. पन्नास वर्षांनंतर ही जोडी दोन टप्प्यांत निर्माण होते, हे कळून आले. न्यूट्रॉनच्या क्षयामध्ये पहिल्या (मधल्या) टप्प्यात वाहक $W^-$ मूलकण उत्सर्जित होतो; यानंतरचा शेवटचा टप्पा काहीसा नंतरच्या काळात व पुढील अवकाशात घडून येतो. या टप्प्यात W मूलकणाचे इलेक्ट्रॉन व न्यूट्रिनो या अंतिम मूलकणांत रूपांतर होते आणि या प्रक्रियेत मुक्त होणारी ऊर्जा वरील दोन कणांच्या गतिज ऊर्जेच्या रूपात मिळते. अवकाश व काळात असणारा हा फरक इतका सूक्ष्म आहे की, त्यामुळे W मूलकणांचे अस्तित्व समजणे शक्य होत नाही. म्हणजे जणू तो लपून गेल्यासारखा वाटतो. $Z^0$ मूलकणांच्या बाबतीतही असेच घडत असते.

हे वाहक मूलकण जोपर्यंत अशा तऱ्हेने लपलेले असतात, तोपर्यंतच अस्तित्वात असतात, असे ठामपणे सांगता येणे शक्य नाही. ते ओळखून व त्यांच्या अस्तित्वाची खातरजमा करून घेण्यासाठी ते मुक्त रूपात निर्माण करणे आवश्यक होते. त्यामुळे संशोधनाची नवी क्षेत्रे खुली होणार होती. मोठ्या कणवेगवर्धकात अणूपेक्षा लहान कणांमध्ये मोठ्या प्रमाणावर आघात घडवून आणल्यास अशा आघातांमधून वरील मूलकण निर्माण होऊ शकतील, ही कल्पना रुबिया व त्यांचे दोन अमेरिकन सहकारी डेव्हिड क्लाइन व पीटर मॅकइनटायर यांनी १९७६ साली एका औद्योगिक परिषदेत मांडली होती. नंतर त्यांनी ही कल्पना फेर्मी प्रयोगशाळेच्या संचालकांपुढे मांडली होती; मात्र त्यांनी ती स्वीकारली नाही. तदनंतर रुबिया आपली कल्पना घेऊन CERN कडे गेले. प्रथम त्यांच्या या कल्पनेवर कोणीच विश्वास ठेवायला तयार नव्हते. शिवाय याकरिता तेथील ४ मैल लांब व ४० कोटी डॉलरच्या सुपर प्रोटॉन सिंक्रोट्रॉनचे आघातकात रूपांतर करावे लागणार होते आणि त्यासाठी ५.५ कोटी डॉलर खर्च होणार होता (आघातक एक गोलाकार कड्यासारखे उपकरण असते. यात मूलकणांच्या शलाकेला प्रवेग देण्यात येतो व ही शलाका विरुद्ध दिशेत फिरणाऱ्या दुसऱ्या शलाकेवर आदळण्याची व्यवस्था केलेली असते) व तेथे चालू असलेल्या प्रयोगांमध्ये बदल करावा लागणार होता. आपला प्रकल्प यशस्वी होईल हे CERN च्या व्यवस्थापकांना पटवून देण्यात शेवटी रुबिया यांना यश आले. अर्थात या व्यवस्थापकांचेही कौतुक करावे लागेल. कारण त्यांनी खर्चाकडे व चालू प्रयोगात होणाऱ्या फेरबदलाकडे पाहिले नाही. हा प्रकल्प पुढे नेण्यास त्यांना १९७९ साली परवानगी मिळाली. यासाठी मोठ्या प्रमाणात प्रतिप्रोटॉन या मूलकणांचा पुरवठा होणे आवश्यक होते. तसा तो साध्य झाल्यावर या आघातकांना प्रोटॉन व प्रतिप्रोटॉन यांच्यात समोरासमोर आघात घडवून आणून व W व Z मूलकण निर्माण करून त्यांचे व त्यांच्या गुणधर्मांचे निरीक्षण करता येणे शक्य होते. मात्र असे दहा मूलकण निर्मिण्यासाठी सुमारे १०० अब्ज आघात होणे आवश्यक असल्याचे अनुमान करण्यात आले होते.

व्हॅनडर मीर यांनी प्रोटॉन एकत्रित करण्याची व साठविण्याची एक कल्पक पद्धती शोधून काढली व ती आता प्रतिप्रोटॉनांसाठीही वापरतात. या पद्धतीच्या शोधामुळेच W व Z मूलकणांचा शोध लागणे शक्य झाले. या पद्धतीला 'स्टोकॅस्टिक कूलिंग' (यदृच्छ स्थिरीकरण) म्हणतात. उच्च ऊर्जा प्रोटॉनांची शलाका लक्ष्यावर आदळून प्रतिप्रोटॉन निर्माण होतात व अनियमित शलाकेच्या रूपात गोळा होतात. या प्रतिप्रोटॉनांचे वेग अतिशय भिन्न असतात व त्यामुळे अशा शलाकेला कणवेगवर्धकात सुसंगतपणे प्रवेग देता येत नाही. त्याकरिता वेगांचा विस्तार (विविधता) कमी करणे आवश्यक असते. या पद्धतीतही विविधता कमी करून अपेक्षित मूल्याच्या (वेगाच्या) जवळपास प्रतिप्रोटॉन एकत्रित केले जातात. ही प्रक्रिया पुनःपुन्हा लाखोवेळा करून शलाका अधिकाधिक स्थिर (कूल) करण्यात येते. १९७४–७८ या चार वर्षांच्या काळात मेर व त्यांच्या सहकाऱ्यांनी यासंबंधीचे प्रयोग केले आणि पुरेशा तीव्रतेची प्रतिप्रोटॉनांची शलाका मिळविण्यासाठी ही कल्पना वापरता येऊ शकेल, हे दाखवून दिले.

अनुक्रमणिका

प्रतिप्रोटॉन निसर्गात आढळत नाहीत. CERN च्या दुसऱ्या कणवेगवर्धकात होणाऱ्या आघातांत त्यांचे समुदाय निर्मिता येतात. या प्रत्येक समुदायातील त्यांची संख्या आवश्यक असलेल्या संख्येच्या १ टक्का एवढीच असते. त्यामुळे असे शेकडो, हजारो समुदाय एकत्रित करणे आवश्यक असते व त्यासाठी अनेक मोठ्या अडचणींना तोड द्यावे लागते. अति-उच्च निर्वात कड्यामध्ये एका कक्षेत फिरणारे व चुंबकीय क्षेत्राने मार्गदर्शित प्रोटॉन एकत्रित करण्याची कल्पक व सुविकसित पद्धती मेर यांनी यापूर्वीच काही वर्षे आधी शोधून काढली होती. प्रथम तज्ज्ञांनाही तिच्यावर विश्वास ठेवणे जड गेले. मात्र CERN मध्ये तिची यशस्वीपणे चाचणी घेतल्यावर ती प्रतिप्रोटॉनांसाठी वापरण्यासही योग्य असल्याचे दिसून आले. परिणामी वरील परिच्छेदात वर्णिल्याप्रमाणे शेवटी कित्येकशे हजारोपट प्रतिप्रोटॉनांचा प्रवाह मिळविण्यात मीर व त्यांच्या सहकाऱ्यांना यश मिळाले. त्यासाठी त्यांनी प्रतिप्रोटॉनांची निर्मिती साठवण व एकत्रीकरण यांकरिता खास सुविधा उभारल्या होत्या. CERN येथील महाकणवेगवर्धकात (सुपर प्रोटॉन सिंक्रोट्रॉन या उपकरणात) आघात घडवून आणण्यास नोव्हेंबर १९८१ साली सुरुवात करण्यात आली आणि अशा प्रकारे रुबिया यांची कल्पना व मेर यांचा शोध यातून आकारास आलेल्या या प्रकल्पात अपेक्षित आणि अनपेक्षित घटनांचा मागोवा घेण्याचे काम अजूनही चालू आहे.

या प्रयोगात थोडे W व C मूलकण शोधून काढून त्यांचे तपशीलवार मापन करायचे होते. हे कण ओळखण्यासाठी खास प्रकारचा अभिज्ञातक बनवायचा होता व त्याच्याकडून मिळणाऱ्या संदेशावर हा शोध आधारलेला होता. हे उपकरण सहज बनविता येण्यासारखे नव्हते. W व C मूलकण पकडणे व त्यांच्या गुणधर्मांचे (उदा., ऊर्जेचे) मापन करणे यासाठी साजेशा अतिप्रचंड अभिज्ञातकाचा आराखडा व उभारणी या कामासाठी रुबिया यांनी शास्त्रज्ञांची एक वेगळी तुकडीच कामाला लावली होती. या प्रचंड अभिज्ञातकाचे वजन २००० टन असून तो 'अंडरग्राउंड एरिया' नावाच्या जागी उभारलेला असल्याने त्याला UAI असे सांकेतिक नाव देण्यात आले आहे. अशा प्रकारे या प्रचंड प्रकल्पाच्या विविध टप्प्यांमध्ये विशेषतः CERN शी संबंधित १३ देशांतील तसेच खुद्द CERN मधील १३० शास्त्रज्ञ व अभियंते अनेक वर्षे दुर्दम्य उत्साहाने सहभागी झाले होते. या सर्वांच्या प्रयत्नांना व चिकाटीला यश येऊन १९८३ सालच्या जानेवारी महिन्यात $W^-$ व $W^+$ हे मूलकण तर मे महिन्यात $Z^0$ कण आढळल्याचे जाहीर करण्यात आले. आता या मूलकणांची अंदाजे वस्तुमाने व क्षयविषयक गुणधर्म माहीत झाले आहेत; मात्र त्यांच्या विषयीची इतर तपशीलवार माहिती (उदा., त्यांचा आयुःकाल, क्षयाची तपशीलवार तऱ्हा) अजून समजलेली नाही. ती मिळविण्याचे प्रयत्न चालू आहेत.

कार्लो रुबिया यांचा जन्म ३१ मार्च १९३४ रोजी इटलीतील गोरिझिया येथे झाला. त्यांचे शिक्षण पीसा विद्यापीठात झाले असून त्यांनी काही काळ अमेरिकेतील कोलंबिया विद्यापीठात काम केले आहे. १९६० च्या सुमारास ते तेथून परत आले व त्या वर्षी ऑगस्टमध्ये CERN मध्ये वरिष्ठ भौतिकीविद म्हणून दाखल झाले. १९७० पासून याशिवाय ते हार्व्हर्ड विद्यापीठात भौतिकीचे प्राध्यापक म्हणूनही काम करीत आहेत. या खवैया शास्त्रज्ञाला इटालियन पदार्थ विशेष आवडतात. शिवाय त्यांना यॉट चालविण्याचा छंद असून त्यांची स्वतःची अशी एक नौका आहे. ते बौद्धिक दृष्ट्या नेहमी अस्वस्थ असतात. सध्या ते चुंबकीय एकध्रुव (आणखी एक फसवा मूलकण) व प्रतिद्रव्य यांचा शोध घेण्याच्या कामात मग्न आहेत.

व्हान डर मेर यांचा जन्म हेग (नेदर्लंड्स) येथे २४ नोव्हेंबर १९२५ रोजी झाला. त्यांनी डेल्फ्ट येथील तांत्रिक विद्यालयातून भौतिकीय अभियांत्रिकीची पदविका संपादन केली असून जिनिव्हा व ॲमस्टरडॅम या विद्यापीठांनी त्यांना सन्माननीय डॉक्टरेट पदव्या दिल्या आहेत. काही काळ त्यांनी फिलिप्स इलेक्ट्रॉनिक्स कंपनीत संशोधक शास्त्रज्ञ म्हणून काम केले आहे. १९५६ साली ते CERN मध्ये दाखल झाले व सध्या तेथे वरिष्ठ अभियंते म्हणून काम करीत आहेत. त्यांचा स्वभाव रुबिया यांच्या विरुद्ध म्हणजे शांत व स्वतःतच रमणारा असा आहे. पारितोषिकाची बातमी ऐकल्यावर ते

फारसे उत्तेजित झाले नाहीत हे खरे; मात्र तरी ते आपल्याला मिळावे असे त्यांना वाटत होते. ते म्हणतात, "असे म्हणू या की, पारितोषिकाला माझा विरोध नव्हता हे खरे; परंतु ते आपल्याला मिळेल अशी आशा करण्यास धजावलो नाही." रुबिया त्यांच्याविषयी म्हणतात, "व्हान डर मेर यांच्या शिवाय हे साध्य करणे आम्हाला शक्य झालेच नसते." मेर सध्या एक नव्या प्रकारचे उपकरण तयार करीत आहेत. या उपकरणामुळे प्रतिप्रोटॉन संचयित स्वरूपात मिळविण्याच्या क्षमतेत दहापट वाढ होऊन वेळेची बचत होणार आहे.

अशा प्रकारे या दोघांच्या आणि इतरत्र चाललेल्या संशोधनकार्यामुळे येत्या काही वर्षांतच उच्च ऊर्जाभौतिकीच्या क्षेत्रात अतिशय महत्त्वाचे शोध लागण्याची शक्यता असल्याचे दिसून येते.

### वैद्यक

या वर्षीचे वैद्यकाचे अथवा शरीरक्रियाविज्ञानाचे नोबेल पारितोषिक तिघांना देण्यात आले आहे. शरीराच्या प्रतिरक्षाविज्ञानाविषयी म्हणजे (रोग) प्रतिकारक्षमताविषयक विज्ञानाविषयी या तिघांनी केलेल्या संशोधनासाठी त्यांना हे पारितोषिक देण्यात आले आहे. त्यांपैकी नील काज जेर्ने या ब्रिटिश वैद्यांना हे पारितोषिक शरीराच्या रोगप्रतिकारार्थ होणाऱ्या प्रतिसादाविषयी मांडलेल्या जालक ( नेटवर्क ) सिद्धांत आणि आधुनिक प्रतिरक्षा विज्ञानातील ( इम्युनॉलॉजीतील ) महत्त्वाचे सिद्धांत विकसित केल्याबद्दल देण्यात आले आहे. प्रतिरक्षा संस्थेमुळे शरीराचे सूक्ष्मजंतू, व्हायरस, परजीवी इत्यादींपासून रक्षण होत असते; जेर्ने यांनी केलेल्या सैद्धांतिक संशोधनामुळे या संस्थेच्या कार्याविषयी नवीन दृष्टी प्राप्त झाली, असे कॅरोलिन्स्का इन्स्टिटयूटने म्हटले आहे; तसेच या विज्ञानामधील ते एक मोठे विचारवंत आहेत, असेही या नोबेल समितीचे मत आहे.

सेझार मिलस्टीन (ब्रिटिश) व जॉर्जेस कोहलर (जर्मन) या दोघांना शुद्ध एकक्रुतकीय प्रतिपिंड ( मोनोक्लोनल ॲन्टिबॉडीज ) निर्माण करण्याचे तत्त्व शोधून काढल्याबद्दल हे पारितोषिक देण्यात आले आहे. अशा तऱ्हेने या तिघांच्या कार्यामुळे पडशापासून ते कर्करोगापर्यंतच्या असंख्य विकारांवरील उपचाराचा मार्ग सापडू शकेल, असे कॅरोलिन्स्का इन्स्टिटयूटचे मत आहे,

जेर्ने यांचा जन्म २१ डिसेंबर १९२१ रोजी लंडन येथे झाला. त्यांचे आईवडील डॅनिश होते. त्यांचे आधीचे शिक्षण हॉलंडमध्ये झाले, नंतर त्यांनी लंडन व कोपनहेगन विद्यापीठांत प्रथम भौतिकी व नंतर वैद्यकाचे शिक्षण घेतले आणि १९५१ साली त्यांनी एम्. डी. पदवी मिळविली. डॅनिश स्टेट सीरम (रक्तरस) इन्स्टिटयूटमध्ये संशोधक (१९४३–५५), जिनिव्हा येथील जागतिक आरोग्य संघटनेचे प्रमुख वैद्यकीय अधिकारी (१९५६–६६), जिनिव्हा विद्यापीठात जीवभौतिकीचे प्राध्यापक (१९६०–६२), पीट्‌बर्ग विद्यापीठातील सूक्ष्मजीवविज्ञान विभागाचे अध्यक्ष (१९६२–६३), फ्रँकफूर्ट येथील जे. डब्ल्यू. गोएटे विद्यापीठात प्रायोगिक चिकित्सेचे प्राध्यापक ( १९६६–६९ ) व बेसेल इन्स्टिटयूट फॉर इम्युनॉलॉजीचे संस्थापक संचालक (१९६९–८०) म्हणून त्यांनी काम केले असून १९८० साली ते सेवानिवृत्त झाले आहेत. या संस्थेत गुणश्री प्राध्यापक म्हणून ते अजूनही काम करतात; मात्र हल्ली त्यांचे वास्तव्य पॅरिसला असते. याशिवाय त्यांनी कॅलिफोर्निया इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी, पाश्चर इन्स्टिटयूट (पॅरिस, १९८१–८२) इत्यादी ठिकाणीही काही काळ काम केले आहे.

१९६४ साली त्यांचा विवाह उर्सुला अलेक्झांड्रा यांच्याशी झाला व त्यांना दोन मुलगे आहेत. अमेरिकन ॲकॅडेमी ऑफ आर्ट्स अ‍ॅण्ड सायन्सेस (१९६७), यू. एस्. नॅशनल ॲकॅडेमी ऑफ सायन्सेस (१९७७), अमेरिकन फिलॉसॉफिकल सोसायटी (१९७९), लंडनची रॉयल सोसायटी (१९८१); फ्रान्सची ॲकॅडेमी ऑफ सायन्सेस (१९८१) इत्यादी संस्थांचे सदस्यत्व; मार्सेल बेनॉइस्ट (१९७९) व अर्लिक पॉल (१९८२) ही पारितोषिके आणि शिकागो, कोपनहेगन, बेसेल, रोटरडॅम व कोलंबिया या विद्यापीठांच्या सन्माननीय पदव्या हे सन्मान त्यांना मिळाले आहेत. त्यांनी जगातील अनेक मान्यवर नियतकालिकांतून प्रतिरक्षाविज्ञानाविषयीचे अनेक लेख लिहिले आहेत. त्यांना खेड्यात जाऊन वैद्यकीय व्यवसाय करण्याची इच्छा होती. तथापि अध्ययनाच्या काळात ते एका वैज्ञानिक

अनुक्रमणिका






प्रयोगशाळेत अर्धवेळ काम करीत असत. ते म्हणतात, "तेव्हापासून मी या वैज्ञानिक संशोधनाच्या पिंजऱ्यात अडकून पडलो."

प्रतिरक्षाविज्ञानातील जेर्ने यांचे कार्य इतर दोघांच्या मानाने अधिक मूलभूत स्वरूपाचे आहे. कारण या विज्ञानातील आधुनिक विचारांवर ज्यांचा ठसा उमटला आहे, अशा थोड्याच शास्त्रज्ञांपैकी जेर्ने हे एक निश्चितच आहेत. डॅनिश स्टेट इन्स्टिट्यूटमध्ये असतानाच त्यांनी प्रतिपिंडाविषयीचे (अँटिबॉडीविषयीचे; एंझाइम, विषारी द्रव्य किंवा बहुधा जास्त रेणुभाराच्या इतर द्रव्यासारख्या प्रतिजनाचा– अँटिजेनचा– शरीराशी संपर्क आला असता त्याची प्रतिक्रिया म्हणून शरीरात जे प्रथिन निर्माण केले जाते त्याला प्रतिपिंड म्हणतात व या खास क्षमतेच्या प्रथिनामुळे प्रतिजन प्रभावहीन होऊन प्रतिकारक्षमता निर्माण होते) संशोधन सुरू केले होते. प्रतिरक्षाविज्ञानात त्यांनी अनेक महत्त्वपूर्ण संकल्पना मांडल्या व त्यांपैकी काही पुढे चुकीच्याही ठरल्या. उदाहरणार्थ, त्यांचा प्रतिजनातर्फे होणाऱ्या प्रतिपिंडनिवडीचा सिद्धांत. प्रतिरक्षासंस्थेला प्रतिपिंड निर्माण करण्यासाठी प्रतिजनांकडून सूचना मिळत नाहीत तर हे प्रतिजन आधीच असणाऱ्या गटामधून संबंधित प्रतिपिंड निर्मिणाऱ्या पेशींची निवड करतात, असे या सिद्धांतात मानले होते.

प्रतिरक्षासंस्था शरीरावर हल्ला करणाऱ्या फक्त 'बाह्य' किंवा 'परक्या' द्रव्याशी मुकाबला करते. हा परकेपणा कोण (व कसा) ठरविते, हे शोधून काढण्याचा त्यांनी प्रयत्न केला. तसेच ही संस्था शरीरात कशी विकसित व परिपक्व होत जाते आणि या संस्थेमधील घटकपेशींचे नियंत्रण कसे होते हे त्यांनी आपल्या प्रमुख सिद्धांतांतून विशद केले आहे. या सिद्धांतांपैकी १९७४ साली त्यांनी मांडलेला जालक सिद्धांत महत्त्वाचा आहे. प्रत्येक प्रतिपिंड हे प्रतिजनाप्रमाणेही कार्य करीत असते, या कल्पनेवर हा सिद्धांत आधारलेला आहे. म्हणजे प्रत्येक प्रतिजनातर्फे घटनांची एक शृंखला (प्रतिपिंड, प्रति-प्रतिपिंड, प्रति-प्रति-प्रतिपिंड वगैरेंसारखी) सुरू होते. अशा प्रकारे प्रतिरक्षासंस्थेतील पेशी जालकरूपात (जाळ्याप्रमाणे) जोडल्या जातात. या सिद्धांताला प्रयोगांद्वारे पुष्टी मिळाली आहे व प्रतिरक्षा संस्थेचे कार्य समजून घेण्यास याची मदत झाली आहे. अवयवांचे प्रतिरोपण करण्यासाठी कराव्या लागणाऱ्या शस्त्रक्रिया, काही प्रकारची अर्बुदे (गाठी) व अधिहर्षता (ॲलर्जी) यांच्यावरील उपचारांच्या दृष्टीने हा सिद्धांत उपयुक्त ठरला आहे.

सेझार मिलस्टीन या रेणवीय जीववैज्ञानिकांचा जन्म ८ ऑक्टोबर १९२७ रोजी अर्जेंटिनामध्ये झाला. १९५२ साली त्यांनी ब्यूनॉस एरीझ विद्यापीठाची पदवी संपादन केली व १९५७ साली जीवरसायन शास्त्राची डॉक्टरेट पदवी मिळविली. १९५८ साली ते इंग्लंडला गेले आणि १९६० साली त्यांनी केंब्रिज विद्यापीठाची पीएच्. डी. पदवी मिळविली. नंतर ते ब्यूनॉस एरीझ येथील प्रख्यात सूक्ष्मजीवविज्ञान संस्थेतील रेणवीय जीवविज्ञान विभागात अध्यापन करू लागले व १९६१ साली त्या विभागाचे प्रमुख झाले. १९६२ साली अर्जेंटिनामध्ये लष्करी क्रांती झाल्यावर त्यांनी देशत्याग केला (तेव्हापासून हजाराहून अधिक शास्त्रज्ञ अर्जेंटिनातून बाहेर गेले असून ते तेथे परतणे अवघड झाले. अशा तऱ्हेने विकसनशील देशांमधून विकसित देशांकडे होणाऱ्या बुद्धिमंतांच्या स्थलांतराच्या प्रश्नाला एक नवीन मिती प्राप्त झाली आहे. नोबेल पारितोषिक मिळविणारे हे तिसरे अर्जेंटेनियन शास्त्रज्ञ आहेत, हे लक्षात घेतल्यास या प्रश्नाचे महत्त्व अधिक जाणवेल.) व १९६३ साली ते केंब्रिज विद्यापीठातील मेडिकल रिसर्च काउन्सिलमधील रेणवीय जीवविज्ञानाच्या प्रयोगशाळेत दाखल झाले. तेथे त्यांनी दोन वेळा नोबेल पारितोषिक मिळविणाऱ्या सँगर यांच्या हाताखाली एंझाइमांमधील ॲमिनो अम्लांचा क्रम ठरविण्याचे काम केले. ते तेथे १९६९ साली प्रथिन रसायनशास्त्र उपविभागाचे संयुक्त प्रमुख व १९७५ साली नियामक समितीचे सदस्य झाले. सध्या ते तेथील प्रथिन व न्यूक्लिइक अम्ल रसायनशास्त्र या विभागाचे प्रमुख आहेत. १९७५ साली ते लंडनच्या रॉयल सोसायटीचे तर त्याआधी ब्रिटिश काउन्सिलचे (१९५८–६०) फेलो झाले. त्यांना वोल्फ व स्लोन तसेच युनेस्कोने पुरस्कारिलेले कार्लोस जे.

अनुक्रमणिका

फिन्ले ( १९८३ ) ही पारितोषिके मिळाली आहेत. १९५३ साली त्यांचा विवाह झाला. त्यांना स्वयंपाक करण्याची व भटकण्याची आवड आहे.

इम्युनोग्लोब्युलीन ( एक प्रतिपिंड ) व फॉस्फो-एंझाइमे यांची रचना, निर्मिती, उत्क्रांती व आनुवंशिकी यांविषयी त्यांनी मुख्यत्वे संशोधन केले असून त्याविषयीचे त्यांचे अनेक लेख प्रसिद्ध झाले आहेत. अर्थात एककृत्तकीय प्रतिपिंडाविषयी त्यांनी केलेल्या संशोधनामुळे त्यांना प्रसिद्धी मिळाली आहे. त्यांनी १९६३ साली प्रतिपिंडाच्या रेणूतील घटकांचा क्रम ठरविण्याचे काम सुरू केले. तेव्हापासून रेणवीय प्रतिरक्षाविज्ञानाचे युग सुरू झाले, असे म्हणता येईल.

जॉर्जेस कोहलर या अडतीस वर्षांच्या जर्मन शास्त्रज्ञांचा जन्म म्युनिक येथे झाला. बेसेल प्रतिरक्षाविज्ञान संस्थेत दाखल झाल्यावर त्यांनी जेर्ने यांच्याबरोबर १९७४ च्या सुमारास प्रतिपिंड निर्मिणाऱ्या पेशी-अस्तराच्या विकासाविषयी संशोधनास सुरुवात केली. १९८० साली ते या संस्थेचे कायम सदस्य झाले. मात्र मार्च १९८५ मध्ये ते फ्रायबर्ग येथील माक्स प्लांक प्रतिरक्षाविज्ञान संस्थेचे सह-संचालक होणार आहेत. कोलहर व मिलस्टीन यांचे संशोधन १९७५ सालीच एकत्रितपणे प्रसिद्ध झाले होते म्हणून त्यांच्या संशोधनाची माहिती पुढे एकत्रित दिली आहे.

'नेचर' या प्रसिद्ध नियतकालिकाच्या ७ ऑगस्ट १९७५ च्या अंकात या दोघांचे एक तीन पानी पत्र प्रसिद्ध झाले होते. 'आधी ठरविलेल्या गुणवैशिष्ट्यांचे प्रतिपिंड स्रवणाऱ्या संयोजित ( संकरित ) पेशीचे अखंड संवर्धन' असे त्या पत्राचे शीर्षक होते. त्या पत्रात त्यांनी शरीराच्या प्रतिरक्षा संस्थेतील प्रतिपिंड म्हणजे रोगाविरुद्ध ( प्रतिजनाविरुद्ध ) रोखलेली प्रक्षेपणास्त्रेच होत असे सांगून अशा अचूक (विशिष्ट प्रतिजनाविरुद्ध वापरता येतील अशा विशिष्ट) प्रतिपिंडांची मोठ्या प्रमाणावर निर्मिती करणाऱ्या पद्धतीचे विवरणही त्यांनी त्या पत्रात केले होते. विविध ठिकाणच्या पेशींच्या संकराद्वारे अशा प्रतिपिंड निर्मिणाऱ्या पेशी बनविता येऊ शकतील, असे त्यांनी पत्रात शेवटी म्हटले होते. मात्र त्या काळात असा दावा करणे धाडसाचे तर ठरणार नाही ना ? अशी मिलस्टीन यांना भीती वाटली होती. मात्र आज सुमारे एका दशकानंतर त्यांची भीती अनाठायी होती व त्यांची अपेक्षाच रास्त होती, असे म्हणता येईल. कारण अशा प्रकारच्या विशिष्ट किंवा एककृत्तकीय प्रतिपिंडनिर्मितीच्या तंत्रामुळे जीववैद्यक संशोधनात क्रांतीच घडून आली असून ही प्रतिपिंडे रोगनिदान, रोगचिकित्सा व बहुतेक प्रकारचे जीव-वैद्यकीय संशोधन यांतील महत्त्वाचे साधन व आवश्यक अंग बनली आहेत. त्यामुळेच या दोघांना नोबेल पारितोषिक मिळाल्याचे विशेष आश्चर्य वाटले नाही. कारण ते अपेक्षितच होते. काही पारितोषिके अपरिहार्य असतात. फक्त ती केव्हा जाहीर होतील एवढाच प्रश्न असतो. प्रतिरक्षाविज्ञानाला हे पारितोषिक मिळण्यासाठी दहा वर्षे वाट पहावी लागली, पण शेवटी ते मिळाले. कदाचित स्वतः मिलस्टीन गेली तीन वर्षे याची प्रतीक्षा करीत असतील !

मिलस्टीन यांनी उंदराच्या मज्जार्बुदातील (अस्थिमज्जेच्या प्राथमिक स्वरूपाच्या व इम्युनोग्लोब्युलीन निर्माण करू शकणाऱ्या गाठीतील) पेशी घेतल्या व खास, निर्जंतुक संवर्धक माध्यमामध्ये कृत्रिम रीतीने त्यांची वाढ केली. या पेशी प्रतिपिंड निर्माण करतात (किंवा स्रवतात); मात्र हे प्रतिपिंड कोणत्या प्रतिजनाविरुद्ध आहे, ते निश्चितपणे ओळखून काढणे जवळ जवळ अशक्य असते. प्रथम त्यांनी मज्जार्बुदाच्या दोन पेशींचा संयोग केला. यामुळे प्रतिपिंडाच्या रेणूची तपशीलवार रचना व त्याच्या निर्मितीशी निगडित असलेल्या जनुकांची (आनुवंशिक लक्षणे एका पिढीतून पुढील पिढीत नेणाऱ्या गुणसूत्रांवरील घटकांची) माहिती मिळण्यास मदत झाली. तथापि प्रतिपिंडाची रचना व त्याचे कार्य यांमधील परस्परसंबंध समजून घेण्यासाठी ज्याची वैशिष्टये माहीत आहेत, अशा प्रतिपिंडाचा अखंड पुरवठा होणे आवश्यक होते. याच सुमारास कोहलर यात सहभागी झाले. पुष्कळ विचारविनिमय केल्यावर त्यांना वरील पत्रातील नवीन कल्पना सुचली व ज्ञात प्रतिजनाविरुद्ध प्रतिरक्षित अशा उंदरातील प्रतिपिंड निर्माण करणारी पेशी आणि मज्जार्बुद पेशी यांच्यात संयोग (संकर) घडवून आणण्याची ही कल्पना पुढे आली

प्रतिपिंड निर्मिणाऱ्या लसिका पेशी (एक प्रकारच्या पांढऱ्या पेशी) त्यांनी उंदराच्या पानथरीतून घेतल्या. या पेशी मेंढीतील तांबड्या पेशींनी एका विशिष्ट प्रतिजनाविरुद्ध प्रतिरक्षित केल्या होत्या. नंतर या पेशी व उंदरातील मज्जार्बुद पेशींचे अस्तर यांचा संयोग केला. तदनंतर या संकरित पेशींचे कृत्तकीकरण (क्लोनिंग, एकाच पेशीचे समविभाजन होऊन अनेक पेशी निर्मिण्याची क्रिया) केले. अशा संवर्धित, निवडक कृत्तकांपैकी (म्हणजे एका संकरित पेशीपासून मिळालेल्या या पेशींपैकी) काही थोडे कृत्तक हे मूळ प्रतिजनाविरुद्धचे एक सुटे विशिष्ट प्रतिपिंड निर्माण करतात (स्रवतात). अशा संकरित कृत्तकाला हायब्रिडोमा म्हणतात व हे एकाच जातीतील एककृत्तकीय प्रतिपिंड निर्माण करू शकतात. प्रतिपिंड निर्माण करणाऱ्या पेशींचे आयुष्य मर्यादित असते. त्या कमी प्रमाणात उपलब्ध होतात व इच्छेनुरूप हवी ती प्रतिपिंडे निर्मिणे कठीण असते. मात्र वरील प्रकारच्या संकरामुळे मज्जार्बुद पेशीचा अमर्यादपणे वाढण्याचा व प्रतिरक्षित लसिका पेशीचा प्रतिजननिर्मितीचा गुणधर्म एकत्रित झाले. परिणामी अखंडपणे वाढणाऱ्या पेशींमध्ये प्रतिपिंड निर्माण करण्यास चालना देणारी जनुके स्थिर करण्यात यश आले व या पेशीला अमरत्व प्राप्त झाले. शिवाय त्यांना प्रतिपिंड स्रवणाऱ्या पेशींचे कर्क पेशीइतक्या जलदपणे गुणन (वाढ) करण्यातही यश मिळाले. अशा तऱ्हेचे संवर्धक म्हणजे इच्छित प्रतिपिंड निर्मितीचा छोटा कारखानाच ठरतो कारण संवर्धकातील प्रत्येक पेशी ही मूळ संकरित पेशीची अगदी हुबेहूब प्रतिकृती (कृत्तक) असते. तसेच असे प्रतिपिंड शुद्ध असल्याने हे तंत्र एक अचूक साधन म्हणून उपयुक्त ठरते. शिवाय ही प्रतिपिंडे विशिष्ट रोगाविरुद्धची प्रतिकारक्षमता येण्यासाठी उपयुक्त ठरू शकतील असेही लक्षात आले. त्यामुळे ही पद्धती वैद्यक व एकूण मूलभूत जीववैज्ञानिक संशोधन यांच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण असल्याचे दिसून आले.

प्रथम हे तंत्र मानवी पेशींकरिता वापरण्यास अवघड गेले; पण शेवटी ग्लासगो व स्ट्राथक्लाइड येथील शास्त्रज्ञांनी यात यश मिळविले. आता एककृत्तकीय प्रतिपिंडे संशोधन व रोगोपचार यांच्या दृष्टीने उपयुक्त ठरली आहेत व त्यांच्या विषयी नवनवीन आशा निर्माण होत आहेत. अशी प्रतिपिंडे कर्कपेशी, मलेरियाचा परजीवी जीव किंवा मेंदूतील विशिष्ट रचना यांसारख्या लक्ष्यांकडे नेता येऊ शकतात. त्यामुळे या तंत्राचा विस्तृत वापर करता येण्यासारखा आहे. अवयवांचे प्रतिरोपण व कर्करोगावरील उपचार यांच्या बाबतीतील या प्रतिपिंडांचा वापर आशादायक ठरला आहे. व्हायरस व परजीवींनी होणाऱ्या संसर्गजन्य रोगांकरिताही ती उपयुक्त ठरू शकतील (उदाहरणार्थ, मलेरियाविरुद्धची लस निर्माण करण्यासाठी). मायेस्थेनिया ग्रेव्हीस या पंगुत्व आणणाऱ्या रोगावरील नवीन उपचारपद्धती विकसित करणे या तंत्राने शक्य होऊ शकेल, असे अनुमान करण्यात आले आहे. शिवाय ज्यांवर शस्त्रक्रिया करता येऊ शकत नाही अशा कर्करोगांसारख्या पुष्कळ रोगांवर उपचार करताना हे तंत्र उपयुक्त ठरू शकेल. कारण प्रभावी औषधांच्या जोडीने ही प्रतिपिंडे म्हणजे 'जादूची औषधी गोळी' ठरू शकतील.

हेतुपूर्वक नवीन जनुकाची निर्मिती व नवीन जननिक (आनुवंशिक) माहिती प्रतिष्ठापित करून अथवा तिचा समावेश करून एखाद्या जातीची गुणवैशिष्ट्ये किंवा गुणसूत्रांचा एकगुणित संच (जीनोम) बदलण्याचे काम जननिक अभियांत्रिकीमध्ये (जेनेटिक इंजिनिअरिंगमध्ये) केले जाते. या अभियांत्रिकीची विशेषत: या तिघांनी विकसित केलेली तंत्रे वापरून विशिष्ट प्रतिपिंडाकरिता जनुक संकेतनाचा (डिऑक्सिरिबोन्यूक्लिक अम्लाच्या न्यूक्लिओटाइडामध्ये क्रमबद्ध असलेल्या आनुवंशिक माहितीचा) रोगवाहकाच्या (उदाहरणार्थ, व्हायरस, सूक्ष्मजंतू वा प्रयोगशाळेतील प्राण्याच्या) जनुकांमध्ये समावेश (जोडणी) करणे शक्य झाले आहे. रेणवीय जीवविज्ञानाच्या दृष्टीने हा महत्त्वाचा टप्पा म्हणता येईल. शिवाय सिद्धांत, प्रयोग, उत्सुकता व योगायोग (किंवा अनपेक्षितपणे मोठे घबाड हाती येणे) यांच्या द्वारे सूक्ष्म वैज्ञानिक दृष्टी कशी प्राप्त होऊ शकते; एवढेच नव्हे तर यामधून मानवाला प्रचंड प्रमाणावर फायदेशीर ठरणाऱ्या संशोधनाची दिशा कशी निश्चित होते, हे या तिघांच्या संशोधनावरून दिसून आले आहे.

अनुक्रमणिका

या तिघांनी उदंड संशोधनकार्य केले आहे व त्यांच्या संशोधनामुळे जीवविज्ञान व वैद्यकशास्त्र यांचे स्वरूप बदलण्याची शक्यता निर्माण झाली आहे. परंतु असे असूनही हे शास्त्रज्ञ अत्यंत विनयशील आहेत. हे पारितोषिक मिळाल्याचे समजल्यावर जेर्ने विशेष उत्तेजित तर झाले नाहीतच; उलट ते म्हणाले, " मी सुरुवात केली तेव्हापेक्षा आज प्रतिरक्षा संस्था अधिक गुंतागुंतीची आहे असे मला वाटते. कधीतरी या संस्थेचे पूर्णतया आकलन होऊ शकेल, याविषयी मी आता पूर्वीइतका आशावादी राहिलो नाही." मिल्स्टीन यांना पेशींचा संकर करण्यात लाभलेले यश हा एक योगायोग वाटतो. त्यांच्या मते कोणताही आधुनिक शोध ही भूतकाळात वैज्ञानिकांनी केलेल्या कार्याची परिणती असते. म्हणून ते आपल्या शोधाचे श्रेय ऊतक संवर्धन पद्धती, पेशीच्या घटकांचे संकरण व प्रतिपिंडनिर्मितीविषयीचा कृत्तकीय निवडसिद्धांत या आधीच्या कार्यांना देतात. यामुळेच जेव्हा त्यांना या शोधाचे एकस्व (पेटंट) का घेतले नाही, असे विचारण्यात आले तेव्हा त्यांनी अतिशय तिखट प्रतिक्रिया व्यक्त केली. ते म्हणाले, " शोध कोणी लावला व कोणाचा फायदा व्हायला हवा ? शोध हा कोणा एका शास्त्रज्ञाचा नसतो. तर तो शास्त्रज्ञांच्या गटाचा असतो. नवा शोध हे पूर्वीच्या शोधांचा अविभाज्य अंग असते." अर्थात आपल्या शोधाचे आर्थिक महत्त्व त्यांच्या लक्षात आलेले नाही, असे नाही. मात्र त्याविषयी अंदाज करण्याच्या फंदात ते पडू इच्छित नाहीत.





# जुने ते सोने : भारतीय पोषणशास्त्राविषयी काही विचार*

पांडुरंग वासुदेव सुखात्मे

आहार कसा असावा व किती घ्यावा याबाबतीत आपल्या पूर्वजांनी बरेच नियम घालून दिले आहेत. उदा., तो समतोल असावा, पौष्टिक असावा, रुचकर असावा, परिपक्व असावा, सात्त्विक असावा हे विचार मला फार मौलिक वाटतात; पण सर्वांत जास्त मौलिक विचार किंवा कल्पना जी पूर्वजांनी मांडलेली आहे ती तो घेण्यासंबंधी आहे. आहार परिमित असावा ही ती कल्पना.

आहार कसा असावा हे आपल्या ताटाकडे बघितले की, आपल्याला कळते. उजव्या बाजूला भाजी व आमटी वाढलेली दिसते; डाव्या बाजूला मीठ, लिंबू, चटणी व कोशिंबीर आणि मध्यभागी मुख्य धान्य पदार्थ एकामागून एक वाढला जातो. प्रथम भात, वरण व तूप वाढण्याची प्रथा आहे. ह्यात पोषणशास्त्रातील सर्व घटक येतात; म्हणजे त्यात शरीराला लागणारी ऊर्जा देण्याची क्षमता आहे, प्रथिने आहेत, स्निग्ध पदार्थ आहेत व जीवनसत्त्वे व खनिज पदार्थही आहेत. दुसऱ्या कोर्समध्ये भाकरी किंवा पोळी व तूप असते आणि त्याला उसळ, आमटी व भाजीची जोड आहेच. येथेही पहिल्या कोर्समध्ये आढळणारी पोषणमूल्ये आपल्याला दिसून येतात व तेच आपल्या आहाराच्या तिसऱ्या कोर्समध्ये म्हणजे दूध किंवा दहिभात यात प्रत्ययास येते.

पण हे झाले मध्यम स्थितीतील लोकांच्या आहाराविषयी. गरिबांच्या आहारात साहजिकच विविधता कमी असते; पण त्यामध्येसुद्धा समतोलाचा विचार आढळतो. ग्रामीण भागातली थाळी पाहिली, तर न्याहरीकरिता कधी गव्हाची खीर असते, तर कधी चटणी-भाकर मिळेल; तसे दुपारच्या वेळेला झुणका, भाकर, कांदा व हिरवी मिरची आणि सायंकाळी बहुतेक भाजी व भाकरी आणि क्वचित प्रसंगी डाळ व भात.

श्रीमंतांच्या आहाराची गोष्ट निराळी. तेथें पेय असते, तळलेले चमचमीत पदार्थ असतात, मांसाहाराची जोड असते व पाश्चात्त्य पद्धतीचे अनुकरण असते. ह्या आहाराबद्दल आपण नंतर पाहू.

सांगण्याचा मुद्दा धान्यपदार्थाला द्विदल धान्यांची जोड दिलेली आढळते. ह्यामुळे रुची वाढते आणि त्याबरोबर आहारातील प्रथिनांची मूल्येही वाढतात. जी ॲमिनो ॲसिड्स भातात किंवा भाकरीत कमी पडतात ती डाळीतून मिळतात व ती एकमेकांना पूरक असल्यामुळे त्यांचे प्रथिनमूल्य वाढते. ह्याला आधुनिक शास्त्रात भरपूर पुरावा आहे. ह्याचा अर्थ पूर्वी हे शास्त्र माहीत होते असा मी करत नाही; माणसाला अनुभवातून हे कळू लागले असे मी म्हणेन. सर्व जगभर असाच अनुभव व परंपरा आहे. पंजाबात मक्याची रोटी व सरसोची साक, कोकणात डाळ-भात, दक्षिणेत इडली-सांबार, मेक्सिकोत तोरतीले आणि बीन्स, इटलीत निखाऱ्यावर भाजलेला पिच्चा त्यावर चीज, मासे, मशरूम्स वगैरे आवडीप्रमाणे घातलेले असते. तसेच ह्या मुख्य पदार्थाबरोबर भाजी किंवा सॅलेड किंवा कांदा घेतल्यामुळे कर्बोदे व प्रथिनाबरोबर खनिज पदार्थांचा व जीवनसत्त्वांचादेखील समावेश होतो. पूर्वजांना हे घटक व त्यांचे गुणधर्म माहीत नसतील; पण त्यांनी जे नियम घालून दिले ते हल्लीच्या पोषणशास्त्राला शक्य तितके धरून होते असे म्हटल्यास गैर होणार नाही. शक्य असेल तर मुलांना दूध व तत्सम उपलब्ध असलेला प्राणिजन्य पदार्थही द्यावा असे सांगितले आहे. उदाहरणार्थ, भाताबरोबर

* आकाशवाणीवरील भाषणाच्या आधारे. —संपादक








मासे घेण्याची बंगालमधील पद्धत. दुधाचा महिमा जिकडे तिकडे आपल्याला वाचायला मिळतो.

आपल्या आहारात सर्व घटकांचा समावेश होतो व त्यात शक्य तितकी विविधता आणून समतोल साधण्याचा व मूल्ये वाढविण्याचा प्रयत्न आपले पूर्वज करीत होते म्हणूनच तो केवळ उपयुक्त व मोलाचा ठरत नाही. आहारातील प्रथिनांचा दर्जा व प्रमाण **समाधानकारक** आहे की नाही, ह्याचाही विचार आपल्या पूर्वजांनी केला असावा असे दिसते. सकृत्दर्शनी हे खरे वाटत नाही कारण विकसित देशांतील आहारात आपल्या आहाराच्या तुलनेने दुप्पट प्रथिने आढळतात व त्यांतली निम्मीअधिक प्रथिने प्राणिजन्य पदार्थांच्या सेवनातून त्यांना मिळतात. त्याचा अर्थ ती श्रेष्ठ दर्जाची असतात. याउलट आपल्या आहारात फक्त १५ ते २० टक्के प्रथिने प्राणिजन्य पदार्थांतून मिळतात. शिवाय प्राणिजन्य पदार्थांचे सेवन आपल्या चौपट ते आठपट असल्यामुळे त्यांना जास्त जीवनसत्त्वे व खनिजे मिळतात आणि ह्याही पलीकडे जाऊन अन्नतंत्रज्ञानाच्या साहाय्याने जीवनसत्त्वे व खनिजांची जोडही त्यांच्या आहारातील निरनिराळ्या पदार्थांना दिली जाते. ह्या त्यांच्या व आपल्या आहारांतील फरकामुळे आपल्या मुलांचे वजन व वाढ त्यांच्या मुलांपेक्षा कमी असते, अशी साहजिकच आपली समजूत झाली आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर जपानने आपल्या पारंपरिक आहारात बदल केला व प्राणिजन्य पदार्थांवर भर देण्यास सुरवात केली. त्याबरोबर त्यांची शारीरिक वाढ झपाट्याने होत गेली. ह्या सर्व गोष्टींचा परिणाम म्हणजे आपण आपल्या पूर्वजांनी शिफारस केलेल्या धान्यप्रधान आहाराच्या गुणवत्तेविषयी संभ्रमात पडलो. यूनोने तर स्वच्छ निष्कर्ष काढला की, भारतात ४० ते ५० टक्के लोकांचा आहार निकृष्ट आहे आणि विशेषेकरून मुलांमध्ये प्रथिननिकृष्टतेचे प्रमाण फार मोठे आहे. आणि पुढे म्हटले की, जोपर्यंत वस्तुस्थिती अशी आहे, तोपर्यंत आपली शारीरिक, सामाजिक व आर्थिक प्रगती होणे कठीण.

यूनोच्या निष्कर्षांचा खोलवर विचार केल्यावर असे आढळून आले की, वस्तुस्थिती निराळी आहे. आपल्या आहारातील प्रथिनांचा दर्जा व प्रमाण कमी दिसले, तरी त्याचा अर्थ पोषणासाठी जरूर ती प्रथिने आपल्या आहारांतून मिळतच नाहीत, असा होतं नाही. अगदी लहान मुलांचे उदाहरण घेऊ या. कोणत्याही वयापेक्षा ह्या वयात वाढ अधिक झपाट्याने होते. याचवेळी प्रथिनेंही जास्त प्रमाणात लागतात. ही प्रथिने लहान मुलांना आईच्या दुधातून पुरविली जातात. आईचें दूध मुलाच्या वाढीला सर्वोत्कृष्ट असतें हें जगन्मान्य आहे. पण आईच्या दुधातसुद्धा ५ ते ६ टक्क्यांपेक्षा अधिक प्रथिने ऊष्मांकरूपाने नसतात, एवढे प्रमाण आपल्या धान्यप्रधान आहारातून आपणास सहज मिळते. इडलीचेच उदाहरण घ्या; लहान मुलाला देण्यास योग्य आणि भूक भागेल इतक्या प्रमाणात इडली दिली तर ही गरज सहज भागते. तेव्हा आहारातील प्रथिनांचे प्रमाण व दर्जा कमी हे आपल्या निष्कृष्टतेचे कारण संभवत नाही. पण आपल्याला असे सांगितले जाते की, उंदराची वाढ माणसाच्या धान्यप्रधान आहारावर तितकी समाधानकारक होत नाही, हे अगदी खरे आहे. पण माणूस म्हणजे उंदीर नव्हे. उंदराची वाढ माणसापेक्षा जास्त झपाट्याने होते. १०० ग्रॅम उंदराचे वजन दुप्पट होण्यास १५ दिवस नव्हे, २५ आठवडे लागतात. तेव्हा उंदराची वाढ होत नाही म्हणून मुलांची पण होणार नाही, हा निष्कर्षच चुकीचा आहे. समजा की आपल्या मुलाचे वजन ८ किलोग्रॅम आहे व वय ६ महिने. अशा मुलाला आपण आईच्या दुधाला पूरक म्हणून इडली देण्याचे ठरविले. अशा मुलाला यूनोने तयार केलेल्या कोष्टकाप्रमाणे अनुरक्षणा (मेन्टेनन्स) करिता १२ ग्रॅम्स व वाढीकरता ४ ग्रॅम्स म्हणजे एकूण १६ ग्रॅम्स प्रथिने लागतात. आईच्या दुधातून सरासरी १२ ग्रॅम्स प्रथिने मुलाला मिळतील. बाकीची थोडी इडली व पेज योग्य स्वरूपात देऊन, सहज भागविता येते. मुद्दा हा की, अनुरक्षणाला लागतात त्यापेक्षा मुलाच्या वाढीला कमी प्रथिने लागतात; पण ह्याउलट १०० ग्रॅम वजनाच्या उंदराला नुसत्या दैनंदिन वाढीकरताच १ ग्रॅम व अनुरक्षणाकरिता फक्त १/१० ग्रॅम म्हणजे एकूण गरजेपेक्षा वाढीला जास्त व अनुरक्षणाला त्यामानाने अगदीच कमी प्रथिने लागतात. हे मात्र खरे की, प्रथिनांचे उपयोजन होण्यास मुलाला पुरेसा आहार व ऊष्मांक








अनुक्रमणिका

दिला पाहिजे. आहारातील नुसते प्रथिनांचे प्रमाण वाढवून हे साध्य होणार नाही.

पूरक आहारातून मुलांना प्रथिने देण्याच्या कार्यक्रमात जे आपल्याला अपयश आले त्याचे मुख्य कारण– अपुरा आहार, अपुरा ऊष्मांक. जरुरीपेक्षा जास्त प्रथिने घेतली, तर अधिकतर प्रथिनांचे म्हणजे अन्नातील नायट्रोजनचे अमोनिया या घातक पदार्थात रूपांतर होऊन त्यापासून मूत्रपिंड व आतड्यांवर मात्र विनाकारण ताण पडतो हेही लक्षात ठेवावयास पाहिजे. पाश्चात्त्य देशात या ताणातून विकृती निर्माण झालेल्या मुलांची व प्रौढांची संख्या वाढती आहे. धान्यप्रधान आहार पुरेसा घेतला, तर पोटावर ताण पडतो म्हणून लहान मुलांना बेबी फूड द्यावे असेदेखील सांगितले जाते. नवीन तंत्रज्ञानांच्या साहाय्याने तयार केलेल्या पदार्थांकरता बाजारपेठ (मार्केट) उत्पन्न करण्यापलीकडे ह्या प्रचाराला महत्त्व नाही. या प्रचारातून शुद्ध पाण्याअभावी बेबीफूड्स देण्यामध्ये जी काळजी घ्यावी लागते ती न घेता आल्यामुळे आफ्रिकेत हजारो मुले मृत्यू पावली हे आता उघडकीस आले आहे. हा अगदी ताजा इतिहास आहे.

वरील विवेचनावरून दिसेल की, आहार कसा असावा ह्याबद्दल आपल्या पूर्वजांना उपयुक्त व मोलाची माहिती होती. ह्या माहितीला शास्त्रीय आधार होता; पण त्याहीपेक्षा आहार किती घ्यावा ह्याबद्दल त्यांच्या कल्पना अधिक पुरोगामी व मोलाच्या होत्या. ते म्हणतात की, आहार परिमित असावा; अतिरेकी सेवन करू नये व त्याचप्रमाणे फार कमी खाऊन इंद्रियांचा कोंडमारा करू नये. दोन्ही टोकांचा त्याग करावा आणि संयमाचा– योगाचा वापर करून जिभेला आवरावे व परिमिती आणावी. याचा अर्थ नुसत्या शरीराच्या पोषणाचा विचार केला नाही, त्याचबरोबर मनाच्या पोषणाचाही त्यांनी विचार केला. ज्ञानेश्वरीत ह्याचे शास्त्रीय विवेचन सापडते. ज्या सूत्रात हे विवेचन सापडते ते असे :

म्हणोनि अतिशये विषयसेवा ।
तैसा विरोध न व्हावा ॥
का सर्वथा निरोधु करावा ।
हेही नको ॥



समस्थिती, ज्याला इंग्रजीमध्ये होमिओस्टॅसिस म्हणतात, त्याचे आहारातील महत्त्व आपल्या पूर्वजांना चांगलेच परिचित होते हे ह्यावरून दिसते. जेथे शरीराबरोबर मनाच्या पोषणशास्त्राचा विचार आपल्या पूर्वजांनी केला आहे, तेथे आधुनिक पोषणशास्त्र थिटे पडते असे म्हटले तर वावगे होणार नाही. आरोग्य नुसते शरीराची उंची, वजन, आकार व ठेवण ह्यांवर अवलंबून नसते; त्याला मनाची जोड द्यावी लागते. आपले जुने पोषणशास्त्र किती श्रेष्ठ दर्जाला पोहोचले होते ते ह्या संकल्पनांवरून दिसते. आधुनिक पोषणशास्त्रात व प्रत्यक्ष आचरणात शारीरिक वाढ व आहार ह्यांतील परस्परसंबंधावर पाश्चात्त्यांनी का इतका भर दिला आहे, ते प्रथम सांगणे जरूर आहे.

पाश्चात्त्य लोकांना त्यांच्या आहारातून सरासरी ३००० हून अधिक ऊष्मांक (कॅलरीज) दरडोई मिळतात; १०० ग्रॅमहून अधिक प्रथिने व १०० ग्रॅमहून अधिक स्निग्ध घटकांचा त्यात समावेश असतो. आपल्या आहारातून दरडोई २००० कॅलरीज्, ५० ते ६० ग्रॅम्स प्रथिने व ३० ग्रॅम्स स्निग्ध पदार्थांची जर तुलना करायची झाली, तर पाश्चात्त्य आपल्याइतकेच किंबहुना थोडे जास्तच धान्य ब्रेडच्या रूपाने घेतात, पण त्याचबरोबर आपल्यापेक्षा दुप्पट ते तिप्पट साखर, तिप्पट ते चौपट स्निग्ध पदार्थ व ज्याला आपण प्रोटेक्टिव्ह फूड्स म्हणतो ते चौपट ते आठपट त्यांच्या आहारात असतात. विज्ञानाला मान्य असल्याशिवाय पाश्चात्त्य लोक इतका आहार घेणार नाहीत, ही आपली समजूत; पण वाजवीपेक्षा ते जास्त खातात हे त्यांनासुद्धा ठाऊक आहे. टू रिच, टू स्वीट आणि टू स्टिम्यूलेटिंग असे त्यांच्या आहाराचे वर्णन करता येईल. ते त्यांच्या संस्कृतीच्या आडही येत नाही. किंबहुना बाजारपेठेत अशाच तऱ्हेचे अन्न उपलब्ध असल्याने त्यांच्यापुढे दुसरा पर्यायच नसतो. सुरुवातीला त्यांच्या अशा आहारामुळे त्यांना रक्तदाब, मधुमेह, हृदयविकार इत्यादींचाच त्रास झाला; पण त्यातूनही त्यांनी मार्ग काढला. पूर्वी जितके हे रोग हानिकारक होते, तितके आता उरले नाहीत. नवीन वैद्यकीय ज्ञानाने त्यांना दाखवून दिले की, बाजारपेठेत उपलब्ध असणारे पदार्थ ह्यांनी न होता ते खाऊ

शकतात. थोडक्यात, हे मात करण्याचे तंत्र त्यांच्या अंगवळणी पडले आहे. What is life for? They enjoy food and they can afford it. थोडक्यात, हे सर्व त्यांच्या विचारसरणीला पटते व त्यांच्या खिशालाही परवडते. आपल्याला ते परवडणार नाही आणि इष्टही नाही. पाश्चात्यांचा आहार व औषधोपचाराबद्दल जाहिरातवजा जे सांगितले जाते, त्याचा उद्देश आधुनिक तंत्राच्या साहाय्याने तयार केलेली नवनवीन खाद्यपेये, प्रथिनभुकटया, टॉनिके, औषधे इत्यादींबद्दल मागणी वाढविण्यापलीकडे असूच शकत नाही. खिशाला परवडत असेल, तर मांसमासे जरूर खा; पण ते खाणे अत्यावश्यक आहे असे मात्र नाही. आपला सर्वंकष परिसर व संस्कृती त्यांच्याहून इतकी भिन्न आहे की, आपण त्यांच्या आहाराचे अनुकरण ते पोषणशास्त्राला मान्य आहे म्हणून करीत राहणे गैर आहे.

आहार परिमित करावा याच्या पाठीशी दोन गृहीततत्त्वे आहेत. पहिले तत्त्व असे की, दैनंदिन आहाराची पातळी–म्हणजेच माणसाची गरज–ही ठरावीक असूच शकत नाही. तिच्यात बदल हा होत असला पाहिजे. ही गरज प्रत्येक व्यक्तीचे वय, लिंग, वजन आणि कष्ट ह्यांच्या पातळीवर अवलंबून असते आणि आधुनिक शास्त्रात ती ठरावीक धरली जाते. एका वयोगटातील निरोगी व्यक्तीची पाहणी करून ही सरासरीरूपात दिली जाते. अशा गरजेचे कोष्टक यूनोने तयार केले आहे. ही गरज ठरावीक मानल्यामुळे त्यापेक्षा कमी खाणारे अर्धपोटी व जास्त खाणारे अतिपोषित असा अर्थ होतो. म्हणजे निरोगी लोकांची पाहणी करूनही निरोगी कोणी नाही असा अर्थ होतो. म्हणून व्यक्तीच्या गरजेतही बदल होत असलाच पाहिजे. दुसरे गृहीत तत्त्व म्हणजे ही गरज स्वनियंत्रित असली पाहिजे. मधुमेह न झालेल्या निरोगी माणसाचे साखरेचे प्रमाण एका विशिष्ट अंकाने न दाखविता एका विशिष्ट कक्षेत मांडले जाते, तेच तत्त्व येथे लागू पडते. मधुमेहाप्रमाणेच अपपोषण व अतिपोषण या दीर्घकालीन अनारोग्याच्या अवस्था आहेत व किमान किंवा कमाल मर्यादेपलीकडे अन्न सेवन केल्यास त्या उद्भवण्याचा धोका असतो. जोपर्यंत माणूस या मर्यादेच्या आत असतो, तोपर्यंत तो आपले विशिष्ट काम वजनात विशेष फरक न होता करू शकतो. याचाच अर्थ तो दोन घास कमी खाऊनही आपले आरोग्य व कार्यक्षमता राखू शकतो. गरज ही अशी परिवर्तनशील व स्वनियंत्रित असते, ह्याला पुष्कळ प्रायोगिक पुरावा आता उपलब्ध आहे. ती तशी नसती, तर आहार परिमित करावा ह्याला अर्थच राहिला नसता.

ज्या यंत्रणेच्या सामर्थ्याने हा मर्यादित समतोल सांभाळला जातो, त्या यंत्रणेस समस्थितीची (होमिओस्टॅटिक) यंत्रणा असे म्हणतात. या समस्थितीच्या कक्षेचे साहजिकच दोन भाग असतात. त्यांपैकी एक भाग स्थिर व दुसरा गतिमान असून कालखंडानुसार बदलतो; पण स्थिर भागाचे तसे होत नाही. झालेल्या प्रयोगांवरून असे दिसते की, ह्या स्थिर विचलनाच्या मर्यादेमधील अंतर सरासरी गरजेच्या ७५ ते १२५ टक्क्यांइतके कमीत कमी असते. याचा अर्थ सरासरी गरजेपेक्षा आहार २५ टक्के कमी घेतला, तर त्याप्रमाणात उत्सर्जन होऊन कार्यक्षमतेवर परिणाम होत नाही आणि तेच तत्त्व सरासरीपेक्षा जास्त आहाराबाबत लागू पडते.

हा दैनंदिन आहारातील फरक ४/५ दिवस चढत असतो व नंतर ४/५ दिवस कमी होत असतो आणि हे सातत्याने होत राहते. जसे एकाच कुटुंबातील मुले सारखी दिसतात तसेच या चढउतारात सारखेपणा दिसतो; म्हणून या स्थिर विचलनाला आनुवंशिक महत्त्व प्राप्त होते.

आपला आहार जर इतका शास्त्रशुद्ध आहे, तर आपली मुले विकसित देशांतल्या मुलांसारखी सुदृढ का होत नाहीत असा प्रश्न उद्भवतो. जसा आहाराचा व आरोग्याचा निकट संबंध आहे, तितकाच निकटचा संबंध सभोवतालचे वातावरण व आरोग्य यांचा आहे, हे त्याला उत्तर आहे. ग्रामीण भागातील व झोपडपट्टीतील राहणीमान पाहिले की, याची कल्पना येते. पिण्यास स्वच्छ पाणी नसते; सांडपाणी वा विष्ठेच्या निचऱ्याची सोय नसते; डासमाश्यांचा उपद्रव असतोच आणि त्यामुळे जुलाब, आमांश यांचा वारंवार फैलाव होतो. त्याचा परिणाम असा की, लहानपणी मुले वर्षातून ५/६ वेळा तरी अशा रोगांनी आजारी पडतात. त्यातून बरे होऊन नेहमीची भूक लागण्यास ७/८ दिवस जातात.

अनुक्रमणिका

परिणामी वर्षातून २/२ महिने जशी भूक लागावी तशी लागत नाही व जे खातात ते बहुतांशी वायाच जाते. याशिवाय जंत व कृमी यांचा त्रास असतोच. आईचे दूध असते तोपर्यंत मुलांमध्ये रोगप्रतिबंधक शक्ती असते. पण एकदा वरचा आहार सुरू झाला की, मुले या रोगांनी ग्रासलेली आढळतात. जगण्यासाठी प्रत्येक प्राणिमात्राला खाल्ले हे पाहिजेच, पण जोपर्यंत राहणीमान इतके शोचनीय आहे, तोपर्यंत नुसत्या पूरक आहारावर भर देणे म्हणजे गाळण्याने पाणी भरण्यासारखी स्थिती आहे. साधनसामग्री कमी पडते असे उत्तर दिले जाते, पण ते पटत नाही. शाळेला नुसते कुंपण घातले की, शाळेच्या आवारात व मुलांच्या कृतीत आमूलाग्र बदल घडवून आणता येतो. तेच विहिरीबाबत व संडास आणि गोबर गॅस प्लॅन्टबाबतही लागू पडते. शिक्षणाच्या माध्यमातून हा फरक व परिवर्तन प्रत्यक्षात आणता येते. आपल्या आनुवंशिकतेची शक्ती जरी आपल्या गुणसूत्रांवर असलेल्या जीन्सने ठरविली जाते तरी प्रत्यक्षात जीन्सचे आविष्करण आपल्या भोवती असणाऱ्या वातावरणावर व त्यापासून शरीरावर होणाऱ्या क्रियाप्रक्रियांवर मुख्यतः अवलंबून असते. म्हणून माणसाची खरी आनुवंशिक संपत्ती व सामर्थ्य क्रिया-प्रक्रियांतून होणाऱ्या अंतरविचलनाच्या स्थैर्यात असते. जसे माणसामाणसांतील विभिन्नतेचे कारण आनुवंशिक असते, तसेच तितक्याच महत्त्वाची विभिन्नता माणसाच्या आत त्याला उपजतच प्राप्त झालेली गुणसूत्रे व जीन्स ह्यांवर असते. माझ्या इंग्रजी लेखात ह्याबद्दल मी खालील भाषेत वर्णन केले आहे : "If I may use Gandhian terminology it truly is a variation that comes from within and gives man the power to regulate and control himself" ... आपल्या पूर्वजांनी आहारात परिमिती आणण्याकरता योगाचा वापर करण्याविषयी जे लिहिले आहे, त्याचे खरे महत्त्व या मर्यादित अंतरविचलनात सामावलेले आहे. म्हणून कुठल्याही आहारविषयक चर्चेत वातावरणाकडे ( भौतिक, रासायनिक व जैविक ) दुर्लक्ष करून चालणार नाही.

सारांश, जे चांगले आहे व ज्याला नैतिक, सामाजिक मूल्यांचा व शास्त्रांचा आधार आहे त्याला चांगले म्हणावयास काहीच प्रत्यवाय नाही; पण आधुनिक पोषणशास्त्राचा आधार देऊन, विशेषतः पाश्चात्त्य लोक जे खातात ते आपल्या परंपरेत कोठे दिसले की, त्याला जुने ते सोने म्हणणे योग्य ठरणार नाही.





अनुक्रमणिका



अनुक्रमणिका







# पोषणमूल्याच्या शोधात

राजीव जोशी

जगण्यासाठी मानवाला काही गरजा भागवाव्या लागतात ह्या गरजांची यादी बरीच मोठी होईल. ह्या गरजांपैकी काही गरजा अधिक महत्त्वाच्या आहेत आणि इतर काही गरजांना त्यामानाने गौण स्थान दिले जाते. कोणती गरज महत्त्वाची आहे आणि तिच्या तुलनेने कोणती गरज कमी महत्त्वाची किंवा गौण आहे, अशी गटवारी करताना विभिन्न विचारप्रवाहांमध्ये मतभेद असू शकतात. कोणाला एखादी गरज अधिक महत्त्वाची वाटेल, तर दुसऱ्या कोणाला दुसऱ्या एखाद्या गरजेला महत्त्वाचे स्थान द्यावेसे वाटेल.

परंतु काही गरजांना मात्र "जीवनावश्यक मूलभूत गरजा" असे मानले जाते आणि ह्या गरजांच्या अशा अतिमहत्त्वाच्या स्थानाबद्दल मतभिन्नता दिसून येत नाही. 'अन्न, वस्त्र, निवारा' ह्या जीवनावश्यक मूलभूत गरजांमध्ये अन्नाला पहिले स्थान दिले आहे. अर्थात शुद्ध हवा आणि पाणी सर्वांना उपलब्ध आहेत, असे येथे गृहीत धरले आहे.

ख्रिस्ती प्रार्थनेत give us this day our daily bread असे म्हटले आहे. फ्रेंच राज्यक्रांतीची सुरुवात 'पावा'च्या मागणीवरून झाली. पंजाबमध्येसुद्धा अतिरेक्यांनी 'अन्नधान्याची वाहतूक बंद पाडू' अशी धमकी दिल्यावर केंद्र सरकारला गंभीर दखल घेणे भाग पडले.

अन्नाला असे महत्त्वाचे स्थान आहे. त्याचप्रमाणे ह्या गरजेच्या पूर्ततेसाठी समाजात अनेक घडामोडी व्हाव्या लागतात. उदा, पाऊस, धरणांचे बांधकाम-खतांचे कारखाने, शेती, माल वाहतूक, धान्याचे वाटप, नोकरी किंवा उपजीविकेचे इतर व्यवसाय, साधने वगेरे वगैरे. अशा रीतीने या गरजेचा प्रश्न हा जीवनाच्या अनेक घडामोडी आणि त्या अनुषंगाने येणारे विविध गटांतील हितसंबंध यांच्याशी गुंतलेला असतो.

त्यामुळे 'अन्नाचे मानवी जीवनातील प्रमाण' या विषयाचा विविध अंगांनी अभ्यास होणे स्वाभाविकच आहे. त्यासंबंधी अनेक प्रमेये, अनेक विचार मांडले जात असतात. त्याचबरोबर अन्नाच्या प्रश्नाशी अनेक हितसंबंध गुंतलेले असतात, हेही आपण लक्षात ठेवले पाहिजे. त्यामुळे या प्रश्नाचा अभ्यास केला जात असताना हितसंबंधांची जपणूक करण्याचे हेतुपुरस्सर किंवा निर्हेतुक प्रयत्न केले जातात. म्हणून अन्नाच्या प्रमाणाविषयी मांडल्या जाणाऱ्या सिद्धांतावर हितसंबंधांची जपणूक करण्याच्या प्रयत्नांची छाप पडणे शक्य असते.

आज वैज्ञानिक ज्ञानाची आणि तंत्रज्ञानाची प्रचंड प्रमाणात वाढ आणि प्रसार होत आहे. नवीन नवीन प्रमेये अधिकाधिक शास्त्रशुद्ध असणार अशी सर्वसाधारण समजून असते. परंतु वैज्ञानिक ज्ञानाची आणि तंत्रज्ञानाची प्रचंड वाढ होऊनही वैज्ञानिकांमध्ये आणि जनसामान्यांमध्ये 'वैज्ञानिक मनोवृत्ती' तितकीशी रुजलेली नाही. तसेच मानवासमोर असणारे प्रश्न आज अधिकाधिक गुंतागुंतीचे होत आहेत. त्यामुळे शास्त्रीय परिभाषेमध्ये मांडले गेलेले नवीन प्रमेय शास्त्रशुद्ध आहे किंवा नाही ते वारंवार परखड तपासणी करूनच ठरवावे लागेल.

जयंत नारळीकर म्हणतात, "वैज्ञानिक मुळात वस्तुनिष्ठ असतो; पण पुढे एखाद्या सिद्धांताशी किंवा प्रयोगाशी त्याचे जवळचे नाते निर्माण झाले की, ही वस्तुनिष्ठता मागे पडत जाते. चूक समोर दिसत असूनही कळत नाही.

"अलीकडे संशोधनाला मोठमोठी बक्षिसे असतात. मानमान्यता मिळते. सन्मान होतो. त्यामुळे अशा मोहाला किंवा सवंग लोकप्रियतेला, वैज्ञानिक बळी पडण्याची शक्यता जास्त आहे." (किर्लोस्कर, एप्रिल १९८२) म्हणूनच प्रत्येक संशोधनाची छाननी करून प्रमेये पुनः पुनः तपासावयास हवीत.

अनुक्रमणिका

Margie Sastry यांच्या मते, "शास्त्रीय संशोधने निष्फळ– टाकावू ठरण्याची अनेक कारणे आहेत. संशोधनामध्ये आढळणाऱ्या चुकांचे Felix Franks यांनी असे विश्लेषण केले आहे की, 'अभिप्राय देताना असणारी चिकित्सेची कुचकामी पातळी, अतिविशेषज्ञता ( Over-specialization ), स्वतःशी प्रतारणा आणि शास्त्रीय संमेलनांमधून आढळणारा शास्त्रशुद्ध– परखड दृष्टिकोनाचा अभाव वगैरे या चुकांमागील कारणे होत.'

"अभावित त्रुटींप्रमाणे जाणीवयुक्त समजुती किंवा दुराग्रह यामुळेही संशोधनात चुका निर्माण होतात. ह्याचे मुख्य कारण म्हणजे अनुदान, पदव्या तसेच मानसन्मान मिळविण्यासाठी एखादा विशिष्ट निष्कर्ष मिळविण्याचे संशोधकावर दडपण असते. शास्त्रीय संशोधनामध्ये स्पर्धा सारखी वाढतच आहे. त्यामुळे आपला 'बहुमूल्य' वेळ दुसऱ्या कोणाचे संशोधन तपासण्यात घालविण्यापेक्षा स्वतःसाठी एखादी 'फलप्राप्ती' (Result) मिळविण्याच्या कामी लावावा अशी धडपड वाढते अर्थातच त्यामुळे संशोधनावरील नियंत्रण अधिकच दुरापास्त होते." ( Society and Science, November 1983 ).

अशा पार्श्वभूमीवर मानवी जीवनाला अत्यावश्यक असलेल्या घटकाच्या– अन्नग्रहणाच्या प्रमाणाच्या बाबतीतील सर्व सिद्धांत काळजीपूर्वक तपासावे लागतील हे उघड आहे. तूर्तास प्रस्तुत लेखासाठी मी महत्त्वाच्या दोनच उदाहरणांची चर्चा करणार आहे. महाराष्ट्र शासनाने शेतमजुरांचे किमान वेतन आणि रोजगार हमी योजनेचे दर या संबंधाने अहवाल देण्यासाठी वि. स. पागे यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमली होती. वेतनाचे किमान दर सुचविताना साहजिकच अन्नग्रहणाच्या किमान मर्यादेचा विचार होणार हे ओघानेच आले. समितीच्या अहवालानुसार किमान वेतनाचा सुमारे ५०% भाग अन्नासाठी खर्च होतो. म्हणजेच अन्नग्रहणाच्या किमांन पातळीतील फरकाचा किमान वेतनावर मोठा परिणाम होतो. किमान वेतन ठरविताना पागे समितीने कमी-अधिक चुकीच्या/ बरोबर माहितीच्या आधारे सूचना मांडल्या आहेत.

अर्थातच ह्या अहवालाचा मराठी विज्ञान परिषदेच्या मुंबई येथे डिसेंबर १९८१ मध्ये झालेल्या संमेलनामध्ये विचार झाला आणि हा अहवाल अशास्त्रीय आहे म्हणून त्याचा निषेध केला. काही व्यक्तींनी याविषयी लेख आणि पुस्तिकाही लिहिल्या आहेत. अशाच किमान वेतन कायद्याच्या तरतुदीखाली शासनाने दि. १६ मे १९८३ रोजी काढलेल्या परिपत्रकाविरुद्ध, मुंबई कामगार सभा या संस्थेने मुंबई उच्च न्यायालयात एक अर्ज दाखल केला आहे. (टाइम्स, २३–९–८३ )

पागे समितीने किमान वेतनाबद्दल शासनास अहवाल देताना अन्नाच्या किमान गरजांबाबत स्वतः संशोधन केलेले नाही. तर दुसऱ्यांनी केलेल्या संशोधनावर या समितीच्या शिफारसी आधारलेल्या आहेत. तसेच ह्या शिफारसी ज्या संशोधनांवर आधारलेल्या आहेत ते संशोधन आणि त्यातील प्रमेये कितपत शास्त्रशुद्ध आहेत ह्याची खात्री करून घेतलेली नाही.

पागे समितीच्या अहवालाचे मी येथे विश्लेषण करू इच्छित नाही. शेतमजुरांचे किमान वेतन, नोकरदारांचे वेतनमान, समाजाच्या किमान गरजांचे अंदाज, समाजाच्या घटकांची शारीरिक स्थिती आणि पर्यायाने समाजात राबवावयाच्या योजनांचे आराखडे तसेच समाजातील गटांच्या हितसंबंधांमधील व्यवहार या सर्व बाबींवर 'अन्नग्रहणाच्या किमान मर्यादा' यांमधील प्रमेयांचा कसा परिणाम होतो एवढेच वाचकांपुढे मांडावयाचे असल्याने पागे समितीच्या अहवालाचा मुद्दा मी येथे उपस्थित केला. आता आपण दुसऱ्या उदाहरणाकडे वळूया.

पां. वा. सुखात्मे हे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे सांख्यकीतज्ञ तसेच आहारतज्ञ आहेत. आहाराच्याही मर्यादेसंबंधी त्यांनी अनेक लेख तसेच निबंध लिहिले आहेत. वि. म. दांडेकर आणि निळकंठ रथ ह्यांनी लिहिलेल्या 'भारतातील दारिद्रय' ह्या पुस्तकाच्या निमित्ताने दांडेकर आणि सुखात्मे यांचे वाद झाले आहेत. संमेलनातील व्याख्याने तसेच 'एकॉनॉमिक अँड पोलिटिकल विकली' ( EPW ) आणि इतर नियतकालिकांमधील लेखांमधून या दोघांमध्ये जाहीर चर्चा झाली आहे.

अनुक्रमणिका

EPW च्या ११-१२-८२ च्या अंकामध्ये सुखात्मे यांचा लेख आला आहे. त्याला दांडेकर यांनी उत्तर दिले किंवा नाही ते मला माहीत नाही त्यानंतर "Newer concepts in Nutrition and Their Implication for Policy." हे सुखात्मे यांनी संपादित केलेले पुस्तक प्रसिद्ध झाले.

सुखात्मे यांच्या पुस्तकातील विविध लेख आणि EPW डिसेंबर १९८२ च्या अंकातील लेख यांची मांडणी सारखीच आहे असे सुखात्मे यांनी मला कळविले होते. तसेच त्यांच्या डिसेंबर १९८२ च्या EPW तील लेखावर माझ्या प्रतिक्रिया मी सुखात्मे यांना कळविल्या होत्या. त्यानंतर सुखात्मे यांनी मला कळविले होते की, मी (राजीव जोशी यांनी) उपस्थित केलेले मुद्दे महत्त्वाचे आहेत आणि **ते प्रत्येकाला अभ्यास करण्यास उपलब्ध व्हावेत** इत्यादी. त्यामुळे या सर्व बाबतीतील माझे प्रतिपादन मी चर्चेसाठी ठेवू इच्छितो.

'अमुक एक प्रकारचे काम करणाऱ्या व्यक्तीसाठी, अमुक एक कॅलरीज् (ऊष्मांकांची) आवश्यकता असते अशा प्रकारे अन्नग्रहणाची पातळी सांगण्याची पद्धत आहे. उदा., कठीण श्रमाचे काम करणाऱ्या मनुष्याला दररोज ३९०० ऊष्मांकांची गरज आहे. कठीण श्रमांचे काम करणाऱ्या स्त्रीला ३००० ऊष्मांकांची गरज आहे. ४ वर्षाच्या बालकाला दररोज १५०० ऊष्मांकांची गरज असते वगैरे (आधार: इंडियन कौन्सिल ऑफ मेडिकल रिसर्च-१९७७). त्यावरून असा समज होतो की, त्या त्या व्यक्तीला दररोज तेवढेच ऊष्मांक मिळावयास हवेत. जास्त मिळाले तर अतिपोषण (over nutrition) होईल आणि कमी मिळाल्यास त्या व्यक्तीचे अर्धपोषण (under nutrition) होईल.

सुखात्मे आणि इतर काहींच्या मते अन्नग्रहणाची आवश्यक पातळी अशी कायम नसते. त्यामध्ये बराच बदल होतो. तसेच अन्नग्रहणाची पातळी प्रचलित पातळीपेक्षा कायम कमी किंवा कायम जास्त अशा स्थितीत दिवसेंदिवस राहिली, तरी त्या त्या व्यक्तीचे वजन आणि क्रियाशीलता (Activity) स्थिर राहू शकतात त्यांच्या मते याचे कारण म्हणजे एखाद्या व्यक्तीच्या अन्नग्रहणाच्या पातळीत फरक पडला, तरी त्याचबरोबर अन्नाचा उपयोग करण्याच्या शरीराच्या कार्यक्षमतेमध्ये फरक पडतो आणि वजन स्थिर राहूनसुद्धा क्रियाशीलतेची पातळी कायम राहते.

वरील सिद्धांताच्या आधारे त्यांचे असे प्रतिपादन आहे की, अन्नग्रहणाच्या प्रचलित पातळीपेक्षा एखाद्या व्यक्तीची अन्नग्रहणाची पातळी अगदी ३०-४० % नी सुद्धा कमी असेल, तरी त्या व्यक्तीचे अर्धपोषण होत आहे, असे समजण्याचे कारण नाही.

अन्नग्रहणाची किमान पातळी प्रचलित पातळीपेक्षा कमी असल्याचा हा सिद्धांत मांडून सुखात्मे यांनी निष्कर्ष काढला आहे की, अर्धपोषितांचे प्रमाण लोकसंख्येच्या ४८% एवढे मोठे नसून साधारण १५ ते २० % एवढेच आहे.

त्यांचे असेही प्रतिपादन आहे की, भारतातील मुले पाश्चिमात्यांच्या मुलांच्या मानाने शारीरिकदृष्ट्या लहान असतात, आहारसुद्धा प्रमाणित व्यक्तीच्या मानाने कमी असतो, म्हणून ती मुले निरोगी नाहीत; असे समजणे चुकीचे आहे. तसेच असे शारीरिक दृष्ट्या लहान असण्याचे कारण गरजेपेक्षा कमी आहार असे नसून, अतिसार आणि अन्नमार्गाचे रोग वारंवार होतात हे होय व या सर्व अभ्यासावरून ते संशोधक असा निष्कर्ष काढतात की, 'निरोगी राहण्यास प्रचलित समजुतीइतक्या आहाराची गरज नसते. कमी आहारातसुद्धा व्यक्ती निरोगी राहू शकते आणि अधिक आहार घेऊनसुद्धा आजारपणाच्या प्रमाणावर परिणाम होत नाही.'

थोडक्यात, या सर्वांच्या मते आहाराची किमान मर्यादा प्रचलित समजुतीपेक्षा कमी आहे आणि या सर्व सिद्धांतांचे दूरगामी परिणाम सुजाण वाचकांच्या लक्षात आलेच असतील. त्यामुळे या सर्व संशोधकांनी काढलेले निष्कर्ष बरोबर आहेत किंवा नाहीत हे बघताना ह्या निष्कर्षांपाठीमागे काय संशोधन आहे ते तपासावयास हवे. हे आधारभूत संशोधन पुढीलप्रमाणे :

Edholm आणि इतर यांनी Food Intake and Energy Expenditure of Army Recruits हा शोधनिबंध १९७० मध्ये प्रसिद्ध केला. त्यासाठी त्यांनी इंग्लंडमधील ३५ लष्करी रिक्रूटांची नमुना पाहणी केली. त्यांचा आहार आणि दैनंदिन क्रिया यांची नोंद ठेवली.

अनुक्रमणिका

ह्या अभ्यासावरून असे दिसते की, बहुतेक व्यक्तींच्या बाबतीत आहारातील ऊष्मांकांचे ग्रहण (Intake) आणि दैनंदिन क्रियांनी होणारा व्यय (Output) यांच्या फरकांमध्ये प्रत्येक वेळी काही प्रकारचा सारखेपणा दिसतो आणि हा फरक खूप वेळेस कायम अधिक (व्ययापेक्षा आहार कायम जास्त) किंवा कायम उणे (आहारापेक्षा व्यय कायम जास्त) असा दिसतो आणि सर्व मिळून ह्या शिलकीचा किंवा तुटीचा आकडा त्या त्या व्यक्तीच्या बाबतीत कित्येक हजार-किलो-ऊष्मांक असा होतो. (टीप : अन्नाची कॅलरी-ऊष्मांक पदार्थविज्ञानाच्या दृष्टीने किलोकॅलरी असतात. अन्नाची कॅलरी म्हणताना फिजिक्समधल्या एक हजार कॅलरी असा अर्थ अभिप्रेत असतो. त्यामुळे वरील वाक्यांचा 'फरकाचा आकडा कित्येक हजार अन्नाच्या-कॅलरी-एवढा मोठा होतो' असा अर्थ अभिप्रेत आहे.)

या पाहणीवरून Edholm यांच्या असेही लक्षात आले की, ऊष्मांकांच्या ग्रहणाच्या पातळीत सतत फरक होत असतो, त्यामानाने व्ययाच्या पातळीत फरक पडत नाही. या निरिक्षणावर सुखात्मे असे भाष्य करतात की, एका ठरावीक पातळीवर काम करणाऱ्या आणि वजन कायम राखणाऱ्या निरोगी व्यक्तीमध्ये अन्नग्रहणाची पातळी रोजच्या रोज बदलत असते. अन्नग्रहणाची पातळी स्थिर असते, ही प्रचलित समजूत साफ चुकीची आहे. चरबी आणि ग्लायकॉलच्या साठ्यांच्या संरक्षणामुळे (Buffered) व्यय त्या मानाने स्थिर राहू शकतो. शरीरातील शक्तीचे हे साठे वापरले गेल्यामुळे हे संरक्षण मिळते. आणि हे साठे कमी होऊ लागले की, जास्त आहार घेऊन त्याची भरपाई होऊ शकते, वगैरे.

'दररोजच्या व्ययामध्ये (Output) फरक न होता आहार मात्र कमीजास्त होत राहतो आणि तरीही वजन स्थिर राहते' हा निष्कर्ष सुखात्मे यांना फार महत्त्वाचा वाटतो. 'कमी किंवा जास्त आहार घेऊन वजन आणि कार्यशीलता यांमध्ये काहीही फरक पडत नाही. अर्थात त्याअर्थी आहार एका मर्यादेपर्यंत कायम कमी राहिला तरी काहीच धोका उद्‌भवत नाही', असा सुखात्मे यांचा सिद्धांत आहे.

सुखात्मे यांनी सुचविलेली कमीत कमी पातळीची मर्यादा (cut off point) कठीण श्रमांचे काम करणाऱ्यांसाठी दररोज साधारण २३०० ऊष्मांक अशी आहे आणि तेही आहार कधीकधी ह्या पातळीच्या खाली गेला, तरी हरकत नाही, सरासरीने ह्या पातळीच्या आसपास आहार राहिला तरी शरीरास पुरेसे होते. (ICMR मात्र ३९०० ऊष्मांकांची पातळी सुचविते हे वाचकांनी येथे लक्षात घ्यावे).

Edholm यांची निरीक्षणे पाहिल्यावर असे दिसते की, प्रत्येकाचा दररोजचा आहार स्थिर नसतो आणि याबाबत कोणाचेच दुमत असण्याचे कारण नाही. परंतु 'ऊष्मांकांचे ग्रहण आणि व्यय यांमध्ये कायम अधिक किंवा कायम उणे राहण्याचा त्या त्या व्यक्तीचा कल दिसतो आणि तरीही त्यांचे वजन मात्र स्थिर राहते', या त्यांच्या निरीक्षणासंबंधी थोडेसे खोलात जाऊन विचार करू या.

पदार्थविज्ञानाप्रमाणे ऊर्जा (किंवा ऊर्जा+वस्तुमान) हे नष्ट होऊ शकत नाही किंवा नवीन निर्माण होत नाही. ग्रहणापेक्षा व्यय अधिक असेल तर एक तर वजन कमी होत राहील, नाही तर दुसरे म्हणजे ग्रहण / व्ययाची मोजणी व आकडेवारी चुकीची आहे, एवढे दोनच निष्कर्ष निघू शकतात. व्यय करण्यासाठी कोठून तरी ऊर्जा मिळावीच लागते. ग्रहणाची ऊर्जा कमी असेल तर वजनात घट होईल. हवेतून किंवा पोकळीतून ऊर्जा निर्माण होणार नाही.

आता 'व्यय त्यामानाने कमी बदलतो, मात्र आहार कमीजास्त होत राहतो' या संबंधाने– निरीक्षणांमध्ये म्हटल्याप्रमाणे त्या ३५ रिक्रूटांचा दिनक्रम सांघिक ठरावीक साच्याचा होता. उदा., कवायत, व्याख्याने, खेळ वगैरे. आहार मनाप्रमाणे घेण्याची (weigh as you eat) मुभा होती. मनाप्रमाणे काम (किंवा आराम) करण्याची मुभा नव्हती.

शारीरिक कष्ट करण्याचे ज्यांच्या ज्यांच्यावर परिस्थितीचे दडपण आहे, अशा वर्गातील काम करणाऱ्यांच्या व्ययामध्ये फारसा फरक पडणार नाही, हे सहज शक्य आहे. शेतमजूर–कामगार–कष्टकरी स्त्रिया इत्यादींना अर्धपोटी राहूनसुद्धा कामाचे मोजमाप भरून द्यावे लागेल. इतकेच

अनुक्रमणिका

कशाला, स्त्रीमुक्तिचळवळीतील तथाकथित कार्यकर्त्या सोडून इतर कुटुंबांतील सुगृहिणी निर्जला एकादशी करीत असतानाच रोजची कामे त्याच तत्परतेने करताना दिसतील.

' व्ययाची पातळी त्यामानाने स्थिर राहते ' ह्या निरीक्षणामागे सामाजिक दडपण किती आहे हे बघण्यासाठी ज्यांच्यावर परिस्थितीचे कोणत्याही प्रकारचे दडपण नाही असे उचभ्रू विद्वान, लहरी कलावंत, धनिकांच्या पत्नी, खुशालचेंडू किंवा उंदीर, ससा, माकड इत्यादी प्रयोगातील प्राणी ( Experimental animals ) यांच्या आहार आणि व्ययाच्या पातळ्यांमध्ये किती फरक होतो, कोणत्या परिस्थितीत होतो अशी नीट पाहणी करावयास हवी.

निरीक्षणांमध्ये अशा त्रुटी आहेत याची बहुदा जाणीव असल्यामुळे, स्पष्टीकरण देताना सुखात्मे यांना काही परस्परविरोधी विधाने करावी लागली आहेत. एकीकडे ते म्हणतात की, ' आहाराची पातळी बदलती राहूनसुद्धा वजन मात्र स्थिर राहते. ' आणि त्याचबरोबर ते असेही म्हणतात की, ' व्ययातील बदल हे शरीरातील चरबीच्या साठ्यांनी संरक्षित ( Buffered ) असतात. जरूर भासेल तसे तसे ( म्हणजे आहारापेक्षा व्यय जास्त झाल्यामुळे तूट दिसते त्या त्या वेळी ) ह्या चरबीचे साठे वापरून शक्ती निर्माण केली जाते. ' आता ' वजन स्थिर राहणे ' आणि ' चरबीच्या साठ्यांमधून तूट भरून काढणे ( म्हणजेच वजन कमी होणे ) ' ह्या दोन्ही गोष्टी एकदम होणे शक्यच नाही. त्याचप्रमाणे ' जादा आहारातून ही तूट भरून काढली जात असेल ' तर ' कायम कमी पातळीवर आहार ठेवून ' किंवा ' ऊष्मांकांची कायम तूट येत असता ' हा ' जादा आहार ' घेण्यास संधी कधी मिळणार ? थोडक्यात ही आकडेवारी किंवा तीवरून काढलेले निष्कर्ष तर्कशास्त्र दृष्टचा कमकुवत आहेत.

दुसरे उदाहरण Edmundson यांचे आहे. त्यांनी ५४ शेतकऱ्यांच्या आहाराच्या आणि उठल्यापासून झोपेपर्यंतच्या क्रियांच्या नोंदी घेतल्या. दर दोन महिन्यांनी ६ दिवस नोंदी घेण्याचा क्रम वर्षभर चालला. त्यावरून त्यांच्या असे लक्षात आले की, सर्वांत जास्त आहार असणाऱ्या १० व्यक्तींच्या मानाने सर्वांत कमी आहार असणाऱ्या १० व्यक्तींची कार्यक्षमता ८०% ने जास्त असते. ही माहिती पुढीलप्रमाणे—

| सापेक्ष कार्यक्षमता * | व्यक्तींची संख्या | ऊष्मांक ग्रहण + | ऊष्मांकांचा व्यय ++ |
|---|---|---|---|
| ०·५९ – ०·७५ | ३ | ३५५९ ± ४८५ | २२६४ ± १०२ |
| ०·७६ – ०·९९ | २० | २७४१ ± २९१ | २४०१ ± ९२ |
| १·०० – १·२४ | २४ | २२२७ ± २०३ | २३८७ ± ११९ |
| १·२५ – १·४९ | ५ | १९१२ ± २०० | २५९० ± ८१ |
| १·५० – १·६३ | २ | १५९० ± १६२ | २४८४ ± ८६ |

* सापेक्ष कार्यक्षमता = ६ दिवसांच्या कामासाठी ऊष्मांकांचा सरासरी व्यय / ६ दिवसांचा सरासरी आहार

\+ व्यक्तीचा दैनिक आहार ( १ कॅलरी = ४·१८६ किलो ज्यूलस् )

++ दहा कार्यपातळ्यांवर लागणारा वेळ × प्रत्येक मिनिटास – होणारा सरासरी ऊष्मांकांचा व्यय



अनुक्रमणिका

Edmundson यांनी या अभ्यासाद्वारे असे दर्शविले आहे की, "जास्त आहार असणाऱ्यांचा चयापचयाचा वेग ( Basal Metabolic Rate ) हा कमी आहारमान असणाऱ्यांच्या मानाने जवळ जवळ दुप्पट असतो. मात्र कमी आहार असणाऱ्या गटाची आणि जास्त आहार असणाऱ्या गटाची वजन, उंची, क्रियाशीलता वगैरे साधारण सारखीच असतात. याचाच अर्थ कमी आहारमान असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या क्रियाशीलतेमध्ये अडथळा येतच असतो असे नव्हे."

Edmundson यांच्या अभ्यासामध्ये सापेक्ष कार्यक्षमतेचा (Relative efficiency) विचार केलेला आहे. अखिल विश्वामध्ये कोणत्याही यंत्रणेमध्ये (System) सापेक्ष कार्यक्षमता १·०० पेक्षा कधीही अधिक असू शकत नाही. मात्र Edmundson यांच्या अभ्यासामध्ये काही व्यक्तींची कार्यक्षमता १·६३ एवढी वाढलेली दिसते. म्हणजे ती व्यक्ती १ कॅलरी उष्णतेचे अन्न खाऊन १·६३ कॅलरी उष्णता बाहेर टाकते. ही ६३% उष्णता शून्यामधून कशी काय निर्माण होते, हे गौडबंगाल आहे. अर्थातच ही आकडेवारी आणि त्यावरून काढलेले निष्कर्ष चुकीचे आहेत.

Chen यांनी बांगला देशातील ग्रामीण भागातील २ वर्षाखालील २,०१९ मुलांची पाहणी केली. त्यांनी असा निष्कर्ष काढला की, हारवर्ड मध्यम प्रमाणित ( Harvard Median Standard ) वजनापेक्षा अगदी ३५% नीसुद्धा वजन कमी असलेल्या मुलांच्या आजाराला बळी पडण्याच्या शक्यतेवर काहीही परिणाम होत नाही. त्यांनी गोळा केलेली माहिती पुढीलप्रमाणे : (पुढील तक्ता म्हणजे खरे तर ३ तक्ते आहेत. २,०१९ मुलांची तीन वेगवेगळ्या निकषांनुसार गटवारी केलेली आहे.)

| पोषणाच्या निकषानुसार अर्धपोषणाची गटवारी | प्रमाणाच्या तुलनेत पोषणाची पातळी | मुलांची संख्या | दर हजारी मृत्यूचे प्रमाण | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | ०–११ महिने | १२–२३ महिने | ०–२३ महिने |
| **वयाच्या मानाने वजन** | | | | | |
| साधारण/प्राथमिक | ७५% पेक्षा जास्त | ५४६ | २३·८ | १२·८ | ३६·६ |
| मध्यम | ६०%–७४% | १०४६ | २६·८ | १५·३ | ४२·१ |
| तीव्र | ६०% पेक्षा कमी | ४२७ | ४६·८ | ६५·६ | ११२·४ |
| सर्व मिळून– | — | २०१९ | ३०·२ | २५·३ | ५५·५ |
| **उंचीच्या मानाने वजन** | | | | | |
| सर्वसाधारण | ९०% पेक्षा जास्त | ३९९ | ३५·१ | १७·५ | ५२·६ |
| प्राथमिक | ८०% ते ८९% | ९७९ | २६·६ | २६·६ | ५३·२ |
| मध्यम | ७०% ते ७९% | ५६६ | २८·३ | २१·२ | ४९·५ |
| तीव्र | ७०% पेक्षा कमी | ७५ | ६६·७ | ८०·० | १४६·७ |
| सर्व मिळून– | — | २०१९ | ३०·२ | २५·३ | ५५·५ |
| **वयाच्या मानाने उंची** | | | | | |
| सर्वसाधारण | ९५% पेक्षा जास्त | १८२ | १६·५ | १६·५ | ३३·० |
| प्राथमिक | ९०% ते ९४% | ६५६ | २२·९ | १६·८ | ३९·६ |
| मध्यम | ८५% ते ८९% | ७१३ | २८·० | ९·८ | ३७·९ |
| तीव्र | ८५% पेक्षा कमी | ४६८ | ५१·३ | ६२·० | ११३·२ |
| सर्व मिळून– | — | २०१९ | ३०·२ | २५·३ | ५५·५ |

उंचीच्या मानाने वजन या निकषानुसार गटवारी केली असता असे दिसते की, हारवर्ड मध्यम प्रमाणित वजनापेक्षा त्या त्या उंचीच्या मानाने फक्त १०% वजन कमी असलेल्या किंवा ज्यांना साधारण (Normal) पोषित असे म्हणता येईल, अशा ०–११ महिने वयोगटातील मुलांचे मृत्यूचे कारण दर हजारी ३५·१ आहे आणि हे प्रमाण सरसकट प्रमाणापेक्षाही जास्त आहे. सर्व मिळून २०१९ मुलांच्या सरासरी मृत्यूचे प्रमाण (०–११ महिने) दर हजारी ३०·२ आहे. त्या मुलांमध्ये कमी आणि योग्य अशा वेगवेगळ्या पातळ्यांवर पोषणाचे प्रमाण असणारी मुले आहेत.

२०१९ मुलांच्या सरासरी पोषणाच्या पातळीच्या मानाने ह्या ३९९ (उंचीच्या मानाने फक्त १० % पर्यंत वजन कमी असलेल्या) मुलांच्या पोषणाची पातळी खालची आहे. सरासरीपेक्षा अधिक अर्धपोषित असलेल्या गटाला 'उंचीच्या मानाने वजन', ही गटवारीची पद्धत 'साधारण पोषित' (Normal) अशा गटात ठेवते. तसेच ह्या पद्धतीच्या गटवारीमध्ये पोषणाची पातळी आणि दर हजारी मृत्यूचे प्रमाण यांमध्ये कोणताही एखादा निश्चित परस्परसंबंध दिसून येत नाही. अर्थातच ह्या प्रकारच्या गटवारीने पोषणाच्या पातळीचे मूल्यमापन होत नाही हे स्पष्ट आहे.

याउलट, इतर दोन गटवारींमध्ये मात्र (एकच अपवाद वगळता) पोषणाच्या पातळीच्या प्रमाणात मृत्यूचे प्रमाण वाढताना दिसते. हारवर्ड मध्यम प्रमाणित वजनापेक्षा अगदी ५% किंवा १०% एवढ्याच फरकाने अर्धपोषण झाले, तरी दर हजारी मृत्यूचे आणि अर्थात त्याचबरोबर आजारी पडण्याचे प्रमाण वाढू लागते. 'अगदी ३५%नी सुद्धा वजन कमी असले, तरी मुलांच्या आजारात बळी पडण्याच्या शक्यतेवर परिणाम होत नाही इत्यादी' हा Chen यांनी काढलेला निष्कर्ष अशास्त्रीय आहे, असेच म्हणावे लागेल.

"प्रचलित समजुतीपेक्षा किमान गरज कमी आहे" वगैरे निष्कर्षांमागे फार मोठी गफलत आहे, हे उघड आहे. निदान या निकर्षाप्रत येण्यासाठी या संशोधकांनी मांडलेला पुरावा पटण्याजोगाही नाही आणि पुरेसाही नाही. त्यामुळे या संशोधकांनी दिलेल्या पुराव्यावरून असे निष्कर्ष काढणे अशास्त्रीय आहे.

असे निष्कर्ष मांडताना (सुखात्मे मानवी मूल्यांचा, मानवतावादाचा उद्घोष करतात हे लक्षात घ्यावयास हवे. इतकेच नव्हे तर (प्रचलित समजुतींपेक्षा कमी आहार घेऊनही) 'वजन टिकविण्याची व कार्यशीलता स्थिर ठेवण्याची यंत्रणा ही एक दैवी देणगी आहे' अशा प्रकारे ते या सर्व प्रकाराचे उदात्तीकरण करतात.

Habicht व इतर आणि Tonner यांच्या लेखांच्या आधारे Donald S. McLaran हे Textbook of Paediatric Nutrition ह्या पुस्तकात लिहितात. "सर्व देशांतील पूर्णपोषित वेगवेगळ्या वंशांमधील मुलांच्या उंची आणि वजन यांमध्ये जवळ जवळ फरक नसतोच. तो फक्त अनुक्रमे ३% आणि ६% इतका कमी असतो. विकसनशील देशांतील सामाजिक–आर्थिक दृष्ट्या दुबळ्या गटातील मुले, वजनाने व उंचीने, पुढारलेल्या देशातील पूर्णपोषित मुलांच्या मानाने तर कमी असतातच; पण समाजाच्या निम्नस्तरावरील ही मुले त्यांच्याच देशातील उच्च स्तरावरील मुलांच्या मानाने उंचीने १२% आणि वजनाने ३०% ने कमी भरतात. लोकसंख्येचा विचार करताना अनुवंशशास्त्रापेक्षा (genetics) पोषणाची पातळी आणि इतर परिस्थितीचे परिणाम महत्त्वाचे असतात, हे लक्षात घ्यावयास हवे."

'पाश्चिमात्य मुलांच्या मानाने भारतातील मुले शारीरिक दृष्ट्या लहान असली तरी निरोगी असू शकतात', किंवा 'असे शारीरिक दृष्टीने लहान असण्याचे कारण गरजेपेक्षा कमी आहार असे नसून, अन्नमार्गाचे रोग वारंवार होतात हे होय', वगैरे सुखात्मे यांचे निष्कर्ष चुकीचेच ठरतात. गर्भामध्ये किंवा लहानपणी वाढीच्या वयात झालेल्या अर्ध–पोषणामुळे वाढ खुंटते आणि अशा अर्धपोषणामुळे उंची कमी होऊन वजनही कमी असेल, तर त्या गटावर निरोगीपणाचा शिक्का मारावयाचा, ही मानवता निश्चितच नव्हे.

आज ह्या विषयामध्ये कळकळीने केलेले शास्त्रशुद्ध सखोल संशोधन व्हावयास हवे आहे. तसे संशोधन जोपर्यंत उपलब्ध नाही तोपर्यंत आपल्याला

अनुक्रमणिका

कमी धोक्याची' भूमिका घ्यावयास हवी. अर्ध-पोषणाचे परिणाम लहानपणीच दिसून येतात, तात्काळ सुरू होतात आणि ते तीव्र असतात. अतिपोषणाचे दुष्परिणाम त्यामानाने खूपच हळूहळू होतात आणि तुलनेने उत्तर आयुष्यात दिसतात.

'कमी आहार चालेल' असे प्रमाणपत्र देऊन समाजाच्या कनिष्ठ वर्गातील लोकसंख्येला अर्ध-पोषणाच्या– अधिक तीव्रतेच्या– धोक्यात लोटण्यापेक्षा, सुरक्षिततेचे महत्त्व लक्षात घेऊन त्यांना अति-पोषणाच्या– कमी धोक्याच्या– पातळीवर ठेवण्याचा आग्रह धरणे हेच अधिक मानवतावादी आहे.





अनुक्रमणिका

# दस्तएवस्कीच्या बांधिलकीचे स्वरूप

अनिरुद्ध कुलकर्णी

' So soon as the man overtook me, he was but a word and a blow '

– Pilgrim's Progress

सध्या पाश्चात्त्य जगतात ज्या संकल्पनेविषयीचे कौतुक ओसरलेले आहे पण आपल्याकडे जिचे महत्त्व वाढल्यासारखे दिसते आहे, तिच्या संदर्भात दस्त-एवस्कीची अवस्था काय होती हे पाहणे अनेक दृष्टींनी उद्‌बोधक ठरते. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस युरोपीय समाज ज्या समस्या आणि संघर्षातून गेले त्यांतून सध्या आपण जात आहोत ही वस्तुस्थितीही या उद्‌बोधनाच्या बाबतीत महत्त्वाची ठरते.

' बांधिलकी ' ही संज्ञा पहिल्या रूढ अर्थाने घेऊ. म्हणजे कम्युनिस्ट अर्थाने. पक्षाशी आणि पक्षाच्या ध्येयधोरणांशी इमान राखणे, त्यांचा आदर करणे आणि त्यांचा गौरव करणे म्हणजे ' कमिटेड ' असणे. साहित्यिक झाला तरी तो या अर्थाने बांधील असला पाहिजे. ' मी प्रथम कम्युनिस्ट आहे आणि नंतर साहित्यिक आहे ' हे शोलोखोवचे प्रसिद्ध उद्‌गार ही बांधिलकी सुरेख तऱ्हेने व्यक्त करतात. ( म्हणूनच या शोलोखोवने सोल्झेनित्सिनला पुनश्च तुरुंगात डांबले पाहिजे अशी भूमिका घेतली होती ).

या अर्थाने गोर्की हा पहिला थोर बांधील साहित्यिक होय. लेनिन, कम्युनिस्ट पक्ष आणि गोर्की यांचे संबंध पुरेसे परिचित आणि सुस्पष्ट होते. अशा प्रकारचे संबंध आपल्याकडे गांधी, काँग्रेस पक्ष आणि साने गुरुजी यांचे होते असे आपण म्हणू शकू. प्रामाणिकपणा आणि उत्स्फूर्तता ही सुरुवातीच्या काळात अशा प्रकारच्या संबंधाची वैशिष्टये असतात. ' मी काँग्रेसच्या दारात झुलणारा हत्ती आहे ' असे आलंकारिक शब्द जरी कोणी वापरले तरी ही वैशिष्टये तेथे असू शकतात. बिचकून जाण्याचे कारण नाही.

गोर्की हा बांधील साहित्यिक होता आणि त्याचे दस्तएवस्कीविषयीचे मत सर्वस्वी प्रतिकूल होते. सोव्हिएट लेखकांच्या पहिल्या काँग्रेससमोर भाषण करताना (१९३४ साली) मक्झिम गोर्कीने दस्त-एवस्कीवर जाहीर टीका केली. तो ऱ्हासकालीन आणि मानवी स्वभावावर शितोडे उडविणारा लेखक आहे हे मत व्यक्त करून १९०५ मध्ये फसलेल्या क्रांतिप्रयत्नानंतर, बुद्धिजीवी वर्ग पुरोगामी मतांपासून दूर गेला याचे खापर त्याने दस्तएवस्कीच्या डोक्यावर फोडले. दस्तएवस्कीने समाजवादी चळवळीला दगा दिल्याची गोर्कीची भावना होती.

या मताला थोडाफार विरोध असला तरी सत्तारूढ कम्युनिस्ट पक्षाचे ते मत ठरले आणि स्तालिनच्या मृत्यूपर्यंत ते तसे टिकून राहीले. दस्त-एवस्कीच्या पुनर्मूल्यमापनाचा आणि ' पुनर्वसना 'चा खराखुरा यत्न सुरू झालेला दिसतो तो त्यानंतर.

दस्तएवस्कीने समाजवादी चळवळीला दगा दिला ही गोष्ट प्रथमदर्शनी खरी आहे. १८४९ मध्ये दस्त-एवस्की ' पेत्राशेवस्की ग्रूप'चा सदस्य होता. हा ग्रूप, ही मंडळी ' युटोपिअन समाजवादी ' बांधिलकी मानणारी होती. त्यावेळच्या रशियात कम्युनिस्ट पक्षच उदयाला आलेला नव्हता. त्यामुळे कम्युनिस्ट पक्षाशी बांधील असण्याचा प्रश्नच नव्हता. प्रश्न होता तो समाजवादाशी इमान राखण्याचा. पेत्राशेवस्की मंडळींवर झारशाहीने जो खटला भरला, त्या खटल्यात दस्तएवस्कीने हे इमान राखल्याचेच दिसून येते. त्याने मंडळींचे हेतू व उद्दिष्टे घातपाती नव्हती असे सांगितले असले तरी त्याचे या ग्रूपशी असलेले संबंधच नाकारलेले नाहीत. दिली गेलेली मृत्यूदंडाची सजा त्याने मोठ्या निर्धाराने स्वीकारलेली आहे. तो मनाने खचला किंवा त्याचा मानसिक तोल नष्ट झाला असे घडलेले नाही. त्याने त्याचा समाजवादी चळवळीशी असलेला संबंध चार वर्षांचा

अनुक्रमणिका






सश्रम कारावास भोगून झाल्यानंतर सोडलेला आहे आणि पुन्हा तो त्या वाटेला गेलेला नाही. दस्तएवस्कीच्या मृत्यूपर्यंत म्हणजे १८८१ पर्यंत समाजवादी मंडळी कोठल्याच तऱ्हेने सत्तेत आलेली नाहीत. त्यामुळे चालत्या गाडीत चढण्याचाही प्रश्न उद्भवलेला नाही.

पेत्राशेवस्की प्रकरण दस्तएवस्कीला चांगलेच भोवले. त्याचे आणि पेत्राशेवस्की मंडळाचे संबंध फार घनिष्ट नव्हते हे खरे. पण एक लक्षात घेतले पाहिजे की, खुद्द पेत्राशेवस्की मंडळाशी निगडित होण्यापूर्वीच गद्धेपंचविशीतील दस्तएवस्कीस समाजवाद म्हणजे काय याची पूर्वकल्पना होतीच. तो काही अनभिज्ञपणे या मंडळात आला होता असे नव्हे. समाजवाद हा झारशाहीच्या संपूर्ण विरोधात असल्यामुळे झारशाही तो चिरडून टाकण्याचाच पवित्रा घेण्याची शक्यता जास्त याची पूर्वकल्पना त्याला नव्हती असे नाही.

बेलिन्स्की हा तत्कालीन विख्यात रशियन विचारवंत आणि टीकाकार होता. त्यानेच दस्तएवस्कीची पहिली कादंबरी 'पूअर फोक' ही प्रकाशात आणण्यास हातभार लावला. स्वत: बेलिन्स्की आणि त्याची चाहती स्नेही मंडळी नवमतवादी आणि सुधारणांचा पुरस्कार करणारी होती. आजही सोवियत रशियात, अर्वाचीन रशियाचे जे सरकारी इतिहास छापले जातात त्यांत विझारियन बेलिन्स्किला मानाचे स्थान दिलेले असते. समाजवादी, नास्तिक आणि विज्ञाननिष्ठ विचार हे बेलिन्स्कीचे वैशिष्ट्य होते. बेलिन्स्कीचे जे पत्र पेत्राशेवस्की मंडळीत गाजले त्यात झारशाही आणि चर्चची सत्ता उखडून टाकली पाहिजे असे विचार होते आणि हे विचार बेलिन्स्की १८४३ पासूनच आपल्या मित्रमंडळीत अनौपचारिकरीत्या मांडीत होता. दस्तएवस्कीने स्वत:च्या भावाला वेळोवेळी जी पत्रे लिहिली आहेत त्यांत बेलिन्स्कीचे विचार आपल्याला पूर्णपणे पटतात, बेलिन्स्की ही थोर विभूती आहे असे उद्गार बऱ्याच वेळा आलेले आहेत.

'पूअर फोक' नंतरच्या कादंबऱ्यांवर बेलिन्स्कीने व त्याच्या ग्रूपने प्रतिकूल टीका करताच दस्तएवस्की त्यांच्यापासून दूर गेला आहे. खुद्द बेलिन्स्कीशी त्याचे संबंध दुरावयास वेळ गेला आहे पण ते दुरावले गेले आहेतच. स्वत:च्या कथा, कादंबरीलेखनापेक्षा या मंडळींची जास्त मातब्बरी त्याला वाटत नव्हती हे उघडच आहे. बेलिन्स्कीचे महत्त्व व मर्यादा मांडणारा एक लेख उतार वयात दस्तएवस्कीने लिहिला होता; पण तो गहाळ झाला आणि नंतर कधीच छापलाही गेला नाही. बेलिन्स्कीवर्तुळ रशियातील महत्त्वाचे वर्तुळ होते. तुर्गेन्येफ, नेक्रातोफ अशांसारख्या मातब्बर साहित्यिकांचा त्यात समावेश होता. पेत्राशेवस्की मंडळातील स्पेशनेफसारख्याला 'मी माझा आत्मा विकला आहे' अशासारखे उद्गार दस्तएवस्की नकळत काढून जातो. याच्या मागे वैचारिक पार्श्वभूमी आहे हे लक्षात घेतले पाहिजे हा या घटनांचा अर्थ.

बेलिन्स्कीविषयी जसा दस्तएवस्कीचा भ्रमनिरास झाला तसाच बेलिन्स्कीचाही दस्तएवस्कीविषयी झाला. यावरून समाजवादाविषयी आकर्षण वाटत असले तरी तो त्याच्या दृढ श्रद्धेचा विषय नसावा हे उघड होते. दस्तएवस्कीचे कौतुक करून त्याला पुढे आणण्यात आपण गाढवपणा केला असे बेलिन्स्कीने त्याच्या मित्राला लिहिलेल्या एका पत्रात म्हटलेले आहे. बेलिन्स्की हा पुढे रशिया सोडून गेला आणि शेवटपर्यंत तो समाजवाद व नवे विचार यांच्याशी निष्ठावान होता हे लक्षात घेण्याजोगे आहे.

मार्क्स आणि दस्तएवस्की समकालीन होते. मार्क्सचा जीवनकाल १८१८ ते १८८३ तर दस्तएवस्कीचा १८२१ ते १८८१. मार्क्स हा युरोपीय बुद्धिवादाच्या परंपरेत वाढलेला समाजचिंतक तर दस्तएवस्की खास रशियाचे अपत्य. त्यांचा एकमेकांशी परिचय अर्थातच नव्हता.

तरुण असताना दोघांवरही तत्कालीन युटोपिअन समाजवादाचा संस्कार झाला आणि प्रभाव पडला. पण मार्क्सने तो समाजवाद नाकारून शास्त्रीय समाजवाद जगापुढे मांडला तर दस्तएवस्कीने समाजवाद नाकारून त्याच्यावर पुढे कडाडून टीकाही केली. हे साम्य आणि वैधर्म्य या ठिकाणी सहज जाणवते.

ज्या समाजवादी बांधिलकीच्या तथाकथित स्वीकृतीसाठी दस्तएवस्कीला चार वर्षांचा सश्रम

अनुक्रमणिका

कारावास आणि सहा वर्षांची सक्तीची लष्करी सेवा सोसावी लागली ती सोडून देण्याची काही कारणे दस्तएवस्कीचे चरित्र पुरविते ती अशी –

पहिले कारण हे की, शिक्षा झाली तरी झारने फाशीच्या शिक्षेतून आपल्याला मुक्त केले याचा आपण समजतो त्यापेक्षा फार मोठा परिणाम आणि चांगला अनुकूल परिणाम दस्तएवस्कीच्या मनावर झाला. याबाबत त्याच्या मनात जी मोठी कृतज्ञतेची भावना निर्माण झाली ती अखेरपर्यंत टिकली. झारशाहीचा तर तो अखेरीच्या पर्वात पुरस्कर्ता बनला. दुसरे कारण हे की, तत्कालीन समाजवाद्यांचा दहशतवाद दस्तएवस्कीला रुचला नाही. स्वातंत्र्य, समता, बंधुत्व ही उद्दिष्टे चांगली होती; परंतु समाजवाद्यांनी स्वीकारलेली साधने व माध्यमे वाईट होती. मौज म्हणजे लेनिननेही ही बाब अस्वीकार्य म्हणूनच मांडलेली आहे आणि समाजवादी चळवळ ही लोकांची, कामगारांची चळवळ करण्यावर पुढे भर दिला आहे. तिसरे महत्त्वाचे कारण हे आहे की, दस्तएवस्कीचा पिंडच मुळी चळवळ्या क्रांतिकारकाचा किंवा राजकारणी व्यक्तीचा नव्हता. तो साहित्यिकाचा होता. आपले तरुण वयातील समाजवादी असणे म्हणजे एक विचित्र पोरखेळ होता असे दस्तएवस्की पुढे अधूनमधून म्हणत असे, असे त्याचे निकटवर्ती स्नेही सांगत. चौथे एक कारण असे संभवते की, ज्या पोलिना सुस्लोवाने दस्तएवस्कीचे उत्कट प्रेम उडवून लावले ती पोलिना समाजवादी होती. समजा पोलिनाचा आणि त्याचा विवाह झाला असता तर तो मनाने समाजवादाच्या आणखी जवळ जाऊ शकला असता, आणि त्याच्या जीवनाला वेगळी दिशा लागू शकली असतीही कदाचित.

कसेही असले तरी दस्तएवस्कीच्या बाबतीत समाजवादाची सक्रिय वा वैचारिक बांधिलकी ही तारुण्यातील भानगड ठरली हेच खरे.

ख्रिश्चॅनिटी, ही दुसऱ्या अर्थाने म्हणजे जीवनभरची एक निष्ठा या अर्थाने दस्तएवस्कीची बांधिलकी होती हा विचार पाहू.

हिंदू कुटुंबात जन्मलेला माणूस जसा संस्काराने हिंदू असतो तशा अर्थाने ख्रिश्चन कुटुंबात जन्मलेला फ्योदोर ख्रिश्चन होता. आपण ख्रिश्चन नाही असे त्याने आयुष्याच्या कोठल्याही पर्वात स्पष्टपणे म्हटलेले नाही. उलट वयाच्या छप्पन्नाव्या वर्षी त्याला ख्रिस्तावर एक पुस्तक लिहावयाचे मनापासून वाटत होते ही गोष्ट त्याच्या चरित्रवाचकांना ज्ञात आहे.

त्याचे वडील सैनिकी डॉक्टर होते. परंतु खास १९ व्या शतकातील वैज्ञानिक जडवाद म्हणून जो होता त्याच्यापासून ते दूर होते. ते व्यसनी होते, कठोर होते; परंतु नास्तिक व निधर्मी कधीच नव्हते. दस्तएवस्कीची आई अस्सल धार्मिक स्त्री असावी तशी होती. नास्तिक आणि निधर्मी स्त्री भेटणे आजही मुश्कील असते. तो तर झारशाहीतील परंपराग्रस्त रशिया होता. दस्तएवस्कीचे आई-वडील सर्व धार्मिक चालीरीती व्यवस्थितपणे पाळीत असत. व्हर्जिन मेरी, ख्रिस्त आणि आई या तिन्हींविषयी निर्माण झालेला जिव्हाळा बालपणापासून अखेरपर्यंत दस्तएवस्कीच्या मनात टिकून होता. "All my hope I place in thee, Mother of God; shelter me under thy mantle" ही प्रार्थना दस्तएवस्की कुटुंबातील प्रत्येकजण झोपण्यापूर्वी न विसरता म्हणत असे. बालपणीच्या नाजूक सुखद स्मृती आणि ख्रिश्चॅनिटी या दस्तएवस्कीच्या मनात एकजीव झाल्या होत्या.

दस्तएवस्कीची पहिली पत्नी मार्या दिमित्र्येवना आणि दुसरी पत्नी अॅना स्नितकिना या दोघीही धार्मिक होत्या. दुसरी पत्नी स्मार्ट, व्यवहारी आणि धडपडी होती परंतु धार्मिक होतीच. दोघींमुळे दस्तएवस्कीच्या घरचे वातावरण हे धार्मिकच राहिले.

आणखी एक महत्त्वाची गोष्ट. तुरुंगात असताना दस्तएवस्कीला एकाच पुस्तकाचे वाचन करता आले. ते पुस्तक म्हणजे बायबलचा 'नवा करार'. दुसरी पुस्तके वाचायला परवानगीच नसे. सैनिकांच्या विधवांची एक सोसायटी होती. तीमधील विधवांनी एक नव्या कराराची प्रत दस्तएवस्कीला भेट दिली होती. तीच तुरुंगात आणि नंतर कित्येक वर्षे त्याच्या बरोबर होती. नव्या कराराच्या या वाचनामुळे ख्रिस्त जीवनाचे व संदेशाचे महत्त्व दस्तएवस्कीच्या मनावर कोरले गेले ते कायमचेच.

ख्रिस्ताशी स्वीकारलेल्या बांधिलकीत दस्तएवस्कीला हवा होता तो अर्थ सापडला. परिणामी

अनुक्रमणिका

त्याची ही बांधिलकी म्हणजे कॅथालिक चर्च संघटनेवर कडाडून हल्ला व ख्रिस्ताचा गौरव ठरली. ख्रिस्ताशी बांधिलकी म्हणजे प्रेम (बंधुता) आणि स्वातंत्र्य या अत्यंत श्रेष्ठ मानवी मूल्यांशी बांधिलकी होय असा अन्वयार्थ त्याने लावला आणि विषमता, अन्याय, अंधश्रद्धा यांना जोपासणाऱ्या चर्चवर त्याने हल्ला चढविला.

क्रांती ही समाजवादाच्या आधीची आहे आणि तिचा गाभा स्वातंत्र्य, समता, बंधुता ही मूल्यत्रयी आहे. दस्तएवस्कीने क्रांतिवाद स्वीकारला पण समाजवाद नाकारला. ख्रिस्त हा कॅथालिक चर्चच्या आधीचा आहे आणि त्याचे सार प्रेम व स्वातंत्र्य हे होय. दस्तएवस्कीने ख्रिस्त स्वीकारला आणि चर्च नाकारले. प्रामुख्याने कॅथालिक चर्च नाकारले. म्हणजे राजा राममोहन रॉयसारखा काहीसा प्रकार दस्तएवस्कीचा आहे. राममोहन रॉय यांनीही उपनिषदांच्या शिकवणुकीचा गाभा स्वीकारला; परंतु प्रचलित अंधश्रद्धा व अन्याय यांनी ओतप्रोत असलेला हिंदुधर्म नाकारला.

ख्रिस्ताविषयी आणि रशियन ख्रिश्चॅनिटीविषयीची ही दस्तएवस्कीची बांधिलकी ( निष्ठा ) पहिल्यापासून शेवटपर्यंत इतकी पक्की होती की, तिच्यापुढे एकोणीसाव्या शतकात निश्चितपणे दिलासा देणारी ठरलेली विज्ञाननिष्ठा त्याच्या जीवनावर म्हणावा असा ठसा उमटवू शकली नाही. आश्चर्याची गोष्ट ही की, दस्तएवस्की हा शिक्षणाने इंजिनिअर होता. पाच वर्षांचा हा अभ्यासक्रम त्याने जिद्दीने पुरा केला होता आणि ड्राफ्ट्समन म्हणून त्याने जीवनाची व्यावसायिक सुरुवात केली होती. पण हे शिक्षण म्हणजे पालथ्या घड्यावर पाणी होते. दस्तएवस्कीने डिझाईन केलेला एक किल्ल्याचा नमुना असा होता की, त्याला दरवाजेच दाखवायचे तो विसरून गेला होता.

धार्मिक माणसे न्यूनगंडापायी भरपूर वैज्ञानिक माहितीची पुस्तके वाचीत राहतात असेही दिसते. आपण धार्मिक असलो तरी वैज्ञानिक दृष्टी आणि प्रगती आपण व्यवस्थित तऱ्हेने पचविल्या आहेत असे दाखविण्याची त्यांची भलीबुरी, प्रसंगी केविलवाणी धडपड चालू असते. अशी धडपडही दस्तएवस्कीने पुढील आयुष्यात केलेली दिसत नाही. फ्रॉइड आणि आइन्स्टीनसारख्या वैज्ञानिकांना आवडणाऱ्या, भुरळ घालणाऱ्या दस्तएवस्कीची ही विज्ञानविषयक अप्रीती पाहून विस्मय वाटल्याखेरीज राहत नाही. दस्तएवस्कीने नंतरच्या आयुष्यात जरा खोलात जाऊन वाचली आहेत ती तत्कालीन मानसशास्त्रावरची पुस्तके; एवढेच !

दस्तएवस्कीने समाजवादी बांधिलकी तरुण वयातच दूर सारली होती तरीदेखील अगदी अखेरीअखेरीस ती डोके वर काढू लागली होती आणि त्याच्या ख्रिश्चन निष्ठेशी स्पर्धा करू पाहत होती असा एक समज निर्माण झाला होता. याचे कारण होते ब्रदर्स कारामाझोफ या कादंबरीचा संकल्पित परंतु लिहिला न गेलेला तिसरा खंड.

या खंडाच्या शेवटच्या दोन शक्यता होत्या. आल्योशा हा या खंडाचा नायक म्हणून आकार घेणार होता. तो ग्रूशेंकाच्या नादाने घसरून पुढे भोगप्रवण आणि पापमय जीवन जगणार होता; परंतु नंतर उपरती होऊन त्याच्या गुरूप्रमाणे म्हणजे झोसिमाप्रमाणेच चर्चकडे परत माघारी येणार होता. ही पहिली शक्यता होती. दुसरी शक्यता ही होती की, आल्योशा भोगप्रवण होणार होता; परंतु लोकांची दुःखे व त्यांच्यावर होणारे अन्याय पाहून क्रांतिकारक होणार होता आणि त्याला अखेरीस फाशी दिले जाणार होते.

पहिली शक्यता उतारवयाचा दस्तएवस्की ज्या प्रकारचे जीवन जगत होता आणि झारशाहीच्या पडत्या काळात का होईना पण त्याला जे मानसन्मान मिळू लागले होते त्याच्याशी सुसंगत वाटते. 'क्राइम ॲन्ड पनिशमेंट' चा जो शेवट आहे तसाच हा शेवट ठरला असता. दुसरी शक्यता दस्तएवस्कीचे 'पुनर्वसन' करू पाहणाऱ्या आजच्या टीकाकारांना महत्त्वाची वाटते; परंतु ती शक्यता निःसंदिग्ध वाटत नाही. कच्च्या आराखड्यात किंवा नोट्समध्ये वेळोवेळी महत्त्वाचे मूलभूत बदलही दस्तएवस्की प्रत्यक्ष कादंबरी लिहिताना करीत असे ही गोष्ट आपण विसरू शकत नाही.

समजा असा मूलभूत बदल त्याने केला असता तर? तर कदाचित फाशीची शिक्षा झालेला आल्योशा दैव बलवत्तर ठरल्याने सुटतो आणि समाजवादी क्रांतीचा मार्ग सोडून चर्चकडे परत येतो









असेही दस्तएवस्कीने दाखविले असते. या शक्यतेच्या बाजूने लेखी पुरावा नाही; परंतु त्याच्या जीवनातील प्रत्यक्ष घटनेचेच चित्रण म्हणून ही शक्यता विचारात घेण्याजोगी ठरते. दुसरे म्हणजे 'क्राइम अ‍ॅण्ड पनिशमेंट'च्या शेवटाचे स्वरूप आणि या शेवटाचे स्वरूप सारखेच दिसले असते. परंतु कसेही असले तरी, दस्तएवस्कीने ख्रिश्चन बांधिलकी जरा का होईना दूर सारली असती ही शक्यता फार दूरची होय.

एकोणिसाव्या शतकातील युरोपात व रशियात तिसरी अधिकृत, रेडिमेड बांधिलकी उपलब्ध होती ती म्हणजे राष्ट्रवादाची. असा 'राष्ट्रवाद' हादेखील फ्रेंच क्रांतीचाच एक परिणाम मानला जातो. बिस्मार्क काय किंवा गॅरीबाल्डी काय ही तत्कालीन ज्वलंत राष्ट्रवादाची मोठी प्रेरणास्थाने होती.

अ‍ॅना स्नितकिनाशी विवाह झाल्यावर म्हणजे १५ फेब्रु. १८६७ नंतर लवकरच नवदांपत्य जिनेव्हाला गेले. हा नुसता मधुचंद्र नव्हता तर देणेकऱ्यांची तोंडे चुकविण्यासाठी आणि येऊ घातलेला तुरुंगवास टाळण्यासाठी उरलेला एकमेव पर्याय होता. या ट्रिपमध्ये आपले आपल्या मायभूमीवर किती खोल प्रेम आहे हे दस्तएवस्कीला फार प्रकर्षाने जाणवले. याच वेळी त्याला प्रखर राष्ट्रवादी क्रांतिकारक गॅरीबाल्डी याचेदेखील दर्शन घडले. ज्या वेळी दस्तएवस्की जिनेव्हामध्ये होता त्याच वेळी तेथे 'शांतता आणि स्वातंत्र्यासाठी आंतरराष्ट्रीय संघ' (दि इंटरनॅशनल लीग फॉर पीस अ‍ॅण्ड फ्रीडम) त्याचे अधिवेशन साजरे करीत होता. प्रशिया विरुद्ध फ्रान्स हा संघर्ष टळावा हे या अधिवेशनाचे उद्दिष्ट होते. या अधिवेशनात त्याला ईश्वरधर्म आणि मानवी कर्तव्यांचा गौरव करणाऱ्या गॅरीबाल्डीचे तेजस्वी दर्शन घडले. राष्ट्रवादाला अशा ईश्वरधर्माची जोड देणे आवश्यकच आहे हे त्याचे म्हणणे दस्तएवस्कीला आवडले असले पाहिजे. आणि याच अधिवेशनात बाकुनिनने केलेली अराजकी समाजवादाची तरफदारी आणि रशियन साम्राज्याची निंदानालस्ती त्याला अस्वस्थ करणारी ठरली असावी.

उतारवयातील दस्तएवस्कीने राष्ट्रवादाचा सूर उचलून धरलेला आहे. बहुतेकांना जशी स्वतःची आई आवडत असते तसे बहुतेकांना स्वतःचा देश, स्वतःचे राष्ट्र आवडत असते. दस्तएवस्की याला अपवाद नाही. दस्तएवस्कीचे राष्ट्रप्रेम त्याच्या कादंबऱ्यांत एवढे ठळकपणे दिसत नाही; परंतु निबंधांत मात्र दिसून येते. असे असले तरी हा राष्ट्रवाद जहाल नाही. जर्मनी आणि जर्मन माणसे (तत्कालीन प्रशिया) यांच्याविषयी त्याचे मत अत्यंत प्रतिकूल आहे. त्यांना नेहमीच तो उपहास आणि कडवट टीका यांचा आधार घेऊन सामोरा जातो. परंतु प्रखर राष्ट्रवादी भारतीयाने पाकिस्तानविषयी दाखवावा असा कडवटपणा तो नाही. दस्तएवस्कीचा राष्ट्रवाद हिटलरी राष्ट्रवादासारखे किंवा फाशिस्ट राष्ट्रवादासारखे आक्रमक व विकृत रूप तर कधीच धारण करीत नाही. उलट रशियाचा राष्ट्र म्हणून तो गौरव करतो ते रशियन्स विश्वबंधुत्वाचा भावी काळात प्रसार करू शकतील या आशेपोटी.

दस्तएवस्कीच्या राष्ट्रवादी भावनेला त्याने जी सक्तीची सहा वर्षे लष्करी सेवा केली होती त्याची जोड होती. त्याने झारची म्हणजे पर्यायाने देशाचीच सेवा केली होती. जखमा बऱ्या झाल्या तरी जखमांचे वण मागे राहतात तसा हा राष्ट्रवाद मागे राहिला होता. जखमा अशासाठी की लष्करी सेवा आणि तीही अगदी खालच्या पदावर आणि तीही रशियातील सैबेरियासारख्या भागात म्हणजे फारच दुस्सह आणि दारुण अवस्था होती. तो एक उघड्यावरचाच तुरुंग होता झाले. राष्ट्रवाद हा व्यासपीठावरील वक्त्यास नेहमीच उपयोगी पडत असतो; वाणीचे तेज तो वाढवीत असतो. सैन्यातील खालच्या थरातील सैनिकांच्या भावना वेगळ्याच असतात.

ही पार्श्वभूमी असल्यामुळे दस्तएवस्कीने राष्ट्रवाद हा विश्वबंधुत्वापेक्षा कमी महत्त्वाचा मानला आहे विश्वबंधुत्वाची भावना ख्रिश्चॅनिटीला स्वभावतःच जास्त जवळची आहे, कारण ख्रिश्चन धर्म आंतरराष्ट्रीय धर्म आहे हे तो ओळखून आहे. राष्ट्रवाद बऱ्याच अंशी नाकारल्याशिवाय तुम्ही ख्रिस्ताजवळ मनाने पोहोचू शकत नाही हे त्याला जाणवलेले आहे.

समाजवादाला दस्तएवस्की विचाराने, तर्कबुद्धीने सामोरा गेला त्यामुळे तो त्याची बांधिलकी होकच

शकला नाही. राष्ट्रवादाला सामोरे जायला लावले ते परिस्थितीने. परिणामतः राष्ट्रवाद ही त्याची खास निष्ठा ठरली नाही. नव्या करारातील ख्रिस्ताला तो संस्काराने, बुद्धीने, अंतःकरणाने, परिस्थितीने, सामोरा गेला म्हणून तो त्याची 'बांधिलकी' ठरला. दस्तएवस्कीचे संपूर्ण व्यक्तित्त्व त्याच्याशी अनेक धाग्यांनी गुंफले गेले.

दुसऱ्या अलेक्झांडर झारच्या कारकीर्दीत राष्ट्र आणि ख्रिस्त या निष्ठा गौरविणारा दस्तएवस्की जणू रशियाचा दरबारी प्रेषितच ठरला. झारशाहीच्या त्या पडत्या, ढासळत्या काळात त्याची उमरावांच्या उच्चभ्रू वर्तुळात ऊठबस होऊ लागली. काँटेस टॉल्स्टॉय, पोबोदोनोत्झेव अशांसारख्या थोरामोठ्यांकडे त्याचे आगतस्वागत होऊ लागले. अर्धमेल्या झालेल्या आणि कोसळत्या राजेशाहीला त्याचा 'रशियावाद' आणि झारप्रेम हे नैतिक पाठिंब्याप्रमाणेच वाटले असणार यात शंकाच नाही. सरकारी मानमरातबांचाही शिडकावा त्याच्यावर उतारवयात झालेला दिसतो. एकीकडे आर्थिक मंदी, युद्धाचा ताण, गरीब जनतेची अत्यंत हलाखीची, दारुण अवस्था, क्रांतिकारकांना मिळू लागलेला वाढता पाठिंबा आणि दुसरीकडे दस्तएवस्कीची शिगेस पोहोचलेली युरोपीय कीर्ती या दोहोंत तत्कालीन प्रतिगामी झारशाही तरी दुसरे काय करू शकणार होती ? दस्तएवस्की, टॉल्स्टॉयसारखे बलदंड साहित्यिक राजी राखणे तिच्या हिताचे होते. शतक बदलले, माणसे बदलली तरी हेच चित्र आजही आपणास दिसू शकते.

अर्थात दस्तएवस्कीची मूलभूत बांधिलकी म्हणजे त्याची माणसाशी असलेली पक्की निष्ठा तो अखेरपर्यंत शाबूत राखू शकला हे सर्वांत महत्त्वाचे होय. "Dostoevsky devoted the whole of his creative energy to one single theme —man and man's destiny." हे सुप्रसिद्ध रशियन अस्तित्ववादी तत्त्वज्ञ बार्दाएव्ह याचे उद्‌गार अक्षरशः खरे आहेत. आज आपण दस्तएवस्कीला मानतो आणि काही जण तर त्याचे स्तोम माजविताना दिसल्यासारखे इतरांना वाटतात ते याचमुळे होय.

दस्तएवस्कीला ही माणसाशी बांधिलकी अगदी तरुण वयातच सापडली. एंजिनिअरिंगचा अभ्यास तो करीत होता, तरी त्याचे कथा, कादंबऱ्या, नाटके यांचे वाचन जोरात चालू होते. पुष्कीन आणि शिलर यांनी तो भारावून गेला होता. किल्ले बांधणे, इमारती उभारणे हे तर त्याचे कामच नव्हते. त्याचे कार्य 'माणसाचा आणि जीवनाचा अर्थ' शोधणे आहे असे त्याला जाणवू लागले होते. त्यामुळेच उत्तमोत्तम साहित्यकृती वाचण्यातूनच त्याला खरी मनःशांती आणि आत्मविश्वास मिळत होता. स्वतःच्या भावाला –मिखाईलला– लिहिलेल्या विद्यार्थिदशेतील एका पत्रात तो म्हणतो,– "माणूस हे एक रहस्य, गूढ आहे. त्याचा भेद हा केलाच पाहिजे. या कामगिरीसाठी जर तुम्ही तुमचे जीवन खर्ची टाकले तर ते वाया गेले असे म्हणू नका. मी या रहस्याला वाहून घेतोय कारण मला माणूस व्हायचे आहे." (यारमोलिन्स्कीकृत चरित्र, पृ. २८)

हे शब्द अतिशय महत्त्वाचे आहेत; कारण या शब्दांमुळे हे सिद्ध होते की, माणसाचे गूढ उकलणे, यासाठी जीवन खर्च टाकणे, सारे आयुष्य जुंपणे आवश्यक आहे ही दस्तएवस्कीची कल्पना होती. नुसते माणसात रस असणे वेगळे. तो विविध प्रकारे आणि बव्हंशी सर्वांनाच असतो. पण त्यासाठी जीवन खर्च टाकण्याची भाषा करणे आणि त्याप्रमाणे हलाखीची परिस्थिती सोसूनदेखील ते टाकणे वेगळे. ही माणसाशी बांधिलकी असणे हेच होय. माणूस मूलतः बिघडलेला आहे, दुष्प्रवृत्त आहे आणि त्याला सुधारला पाहिजे यासाठी जीवनभर काही कार्य करणे हीदेखील माणसाशी बांधिलकीच आहे. पण ती नैतिक आहे तर दस्तएवस्कीची बांधिलकी ज्ञानमार्गी आहे, सर्जनशील आहे, एवढाच फरक.

विद्यार्थिदशेपासून ही बांधिलकी नसती तर तो गोल्यादकीनसारखी मानसशास्त्रीय दृष्ट्या गुंतागुंतीची व्यक्तिरेखा निर्माणच करू शकला नसता. ही गुंतणूक, ही व्यग्रता या दिशेनेच पुढे सरकली असती तर दस्तएवस्की मानसिक दृष्ट्या अवघड व्यक्तिमत्त्वात रमला, तो रमला असताच. पण तुरुंगात जावे लागल्याने दस्तएवस्कीला गुन्हेगार माणसांच्या अंतरंगाचा वेध घेण्याची प्रेरणा मिळाली. आणि या प्रेरणेतूनच पुढे रास्कोलनिकोफ, स्तावरो-









जिन, स्मेर्द्याकोफ यांसारख्या एकापेक्षा एक अविस्मरणीय व्यक्तिरेखा निर्माण झाल्या. सैन्यातील सहा वर्षांची नोकरीही त्याची ही मूळ निष्ठा, सुरुवातीची बांधिलकी बळकट करण्यास उपयुक्त ठरली. ' मोस्ट अनफॉर्च्युनेट इव्हेंट ' सारखी कथा किंवा जनरल येपान्चिन किंवा इवोल्जिनसारख्या व्यक्तिरेखा तो त्यामुळेच निर्मू शकला.

दस्तएवस्कीचा निकटवर्ती स्नेही स्त्राखोब हा एके ठिकाणी म्हणतो,-"त्याचे सारे लक्ष लोकांवर केंद्रित झालेले होते. त्याचे सारे प्रयत्न त्यांची जडणघडण आणि स्वभाव समजून घेण्यासाठी चालत. लोक, त्यांची मनोवृत्ती, जगण्याची तन्हा, भावना, विचार हे त्याचे एकमेव लक्ष्य होते." माणसाचे मूल्यमापन करणे, तो बरा आहे का वाईट आहे हे ठरविणे आणि त्यातच आनंद मानणे ह्यात दस्तएवस्कीला फारसा रस नव्हता. तुरुंगात डांबल्या गेलेल्या तथाकथित गुन्हेगारांतही अतिशय अस्सल आणि गुणवान माणसे असू शकतात हे त्याने प्रत्यक्ष अनुभवले होते. माणसाला समजावून घेणे त्याच्या मनाच्या, व्यक्तिमत्त्वाच्या थरांची उलगड करणे आणि माणसाच्या अंतरंगातील गुंतागुंतीचे चित्रण करणे ही त्याच्या बांधिलकीची दिशा होती.

' सामान्य माणूस ' आहे त्या अनेक विसंगतींच्या स्वरूपात दस्तएवस्की स्वीकारतो. ही एक धैर्याची गोष्ट होय. दुष्ट-सत्प्रवृत्त, शूर-भेकड, नीच-उदात्त, त्यागी-भोगी अशा उलट सुलट प्रकारची माणसे तो परस्परविरुद्ध प्रवृत्तींच्या अशा झंझावातात सापडलेली पाहतो आणि रंगवतो. माणसांविषयी काही अंतिम निर्णय काढणे मुश्कील. ठरावीक रूढ कल्पनांत तर माणसाचे बिनभरवशाचे, अथांग माणूसपण बसणेच कठीण. ' जुगारी ' कादंबरीत तिचा नायक अलेक्सीस हा एके ठिकाणी स्वतःविषयी जे म्हणतो, ते उद्‌गार दस्तएवस्कीची माणसाविषयीची आणि मानवी जीवनाविषयीची एकंदर दृष्टी काय होती यावर सुंदर प्रकाश टाकतात. अलेक्सीस म्हणतो,- " लोक काय म्हणतात याची मला अजिबात पर्वा नाही. मी तर माझ्या हातानेच सगळे ओढवून घेतले आहे. माझे वागणे ठरावीक निकषांवर तपासून बघण्याचा खटाटोप निरर्थक आहे. प्रतिष्ठितपणाच्या निकषांवर तर त्याचा विचारच करता येणार नाही. रूढ नैतिक मूल्यांच्या आधारे त्यांची छाननी करण्याएवढा हास्यास्पद प्रकार दुसरा नसेल. " मौज म्हणजे हे उद्‌गार दस्तएवस्कीच्या स्वतःच्या चरित्राविषयीदेखील अर्थपूर्ण ठरतात.

अशा सामान्य माणसाविषयीदेखील दस्तएवस्कीच्या मनात एक प्रकारचा विश्वास दाटून होता. त्याच्या बालपणीची एक कथा आहे. चेरमाश्न्या या त्यांच्या गावी दस्तएवस्की कुटुंबाचे एक घर व थोडीशी शेती होती. घराच्या पिछाडीलाच मोठे जंगल होते. जंगलात लांडगे फिरत असत. आणि मुले तरीही त्याच्या बाजूला खेळायला म्हणून जात असत. लहानगा फ्योदोर खेळायला गेला असताना, एकदा वाट चुकला. त्याच वेळी त्याला एक लांडगा दिसला. छोटया फ्योदोरची भीतीने पार गाळण उडाली. रस्ता चुकलेला आणि त्यात उभा समोर हिंस्र लांडगा. तो इतका भेदरला की, त्याच्या तोंडातून किंकाळीही फुटेना. एवढ्यात कर्मधर्मसंयोगाने दस्तएवस्की कुटुंबाचा एक वृद्ध शेतकरी तेथे आला. छोटा फ्योदोर धावत धावत गेला आणि त्या म्हाताऱ्याला बिलगला. भीतीने तो थरथरत होता. म्हाताऱ्या शेतकऱ्याने त्याला प्रार्थना म्हणायला सांगितले. तीही त्याला म्हणता येईना. अखेरीस त्या विश्वासू शेतकऱ्यानेच प्रार्थना म्हटली आणि दस्तएवस्की शांत झाला. लांडगा केव्हाच पसार झाला होता.

ही कथा प्रतिकात्म ठरते. दस्तएवस्कीला जीवनातील दुष्टतेचे-ईव्हिलचे- दर्शन घडते आणि घाबरलेला दस्तएवस्की शेतकऱ्याच्या रूपातील ख्रिश्चन माणसाला बिलगतो. तो स्वतः निश्चयी ख्रिश्चन होऊ शकला नाही तरी सामान्य माणसावरील विश्वासच त्याला धीर देतो, शांत करतो असा या प्रतिकात्म कथेचा अर्थ आपण लावू शकतो.

दस्तएवस्कीच्या मूलभूत बांधिलकीवर पडलेली ख्रिश्चन छाया, ख्रिश्चन नसलेल्या त्याच्या वाचकांच्या थोडीफार आड येऊ शकते हे आपण त्याच्या ' क्राइम अँण्ड पनिशमेण्ट ' आणि ' ब्रदर्स कारामाझोफ ' या दोन सर्वश्रेष्ठ कादंबऱ्यांवरून म्हणू शकतो. परंतु हेही लक्षात ठेवले पाहिजे की, त्याच्या निम्म्याहून अधिक साहित्यकृती अशा आहेत की,



अनुक्रमणिका

त्यांचा ख्रिश्चन बांधिलकीशी अगदी प्रत्यक्ष असा संबंध नाही आणि या कथा, कादंबऱ्याही तोलामोलाच्या आहेत. 'दि इटर्नल हज्बंड' किंवा 'जुगारी' या सहज उदाहरणादाखल म्हणून देता येतील.

माणसाशी असलेल्या या बांधिलकीचा प्रत्यक्ष अन्वयार्थक परिणाम म्हणून दस्तएवस्की, भ्रमिष्ट, वेडे, नडल्यापिडलेल्या स्त्रिया, वेश्या, गुन्हेगार प्रवृत्तीची माणसे, व्यसनी, जुगारी, मध्यम वर्गातील असहाय दुर्दैवी माणसे यांच्याशी जाणूनबुजून जिव्हाळ्याचे संबंध ठेवीत असे. तो स्वत: वरच्या वर्गातील वा जातीतील नव्हताच; परंतु जनसामान्यांशी मैत्री ठेवणे त्याच्या हार्दिक सदिच्छांचा स्वाभाविक भाग असे. उच्चभ्रू, खानदानी आणि बड्या मंडळीमध्ये तो क्वचित जाई, नाही असे नाही; परंतु तेथे रमत नसे. त्याच्या अनेक स्नेह्यासोबत्यांनी हे नमूद करून ठेवलेले आहे. सामान्य माणसांच्या आनंदाने तो आनंदी होई आणि त्यांच्याच दुःखाने तो दुःखित होई.

तुरुंग काय, झारशाहीने बांधलेला असो की कम्युनिस्टांनी उभारलेला असो, की नाझी जर्मनांनी तयार केलेला असो; त्या तुरुंगात शिरणाऱ्या आणि तेथे देहदंड सोसणाऱ्या कैद्याला त्यामुळे फार मोठा फरक पडत नसतो. दस्तएवस्की हा अनुभवाने आणि मनाने कैद भोगणारा कैदी होता. राजवट ब्रिटिशांची असली काय आणि काँग्रेसची असली काय तळागाळातला माणूस भरडलाच जात असतो. दस्तएवस्की मनाने या तळागाळातल्या माणसाशी एकरूप पावत होता. मनाने त्याच्याबरोबरच होता. मोठमोठ्या ऐतिहासिक विभूतींमधील तेजास्वितेपेक्षा त्याला सामान्य, सोसणाऱ्या माणसामधील ठिणगी शतपटीने मोलाची वाटत असे. आर्यावन स्टोन या अमेरिकन कादंबरीकाराने मायकेल एंजेलो, लिंकन, डार्विन अशा इतिहासप्रसिद्ध व्यक्तींच्या जीवनावर कादंबऱ्या लिहिल्या आहेत. दस्तएवस्की नेमके उलट करतो. सामान्य माणसांतील असामान्यत्व तो चित्रित करतो. त्यांच्यातील थोरवीकडे तो आपले लक्ष वेधतो.

या बांधिलकीचे एक वैशिष्ट्य आहे. देव आणि ख्रिस्त ह्यांच्यासाठी माणूस नसून माणसासाठी ते आहेत अशा प्रकारची जाणीव तिच्यात आहे. 'जर देव नसेल तर मी कॅप्टन तरी कसा असणार' असे लेब्यात्कीन तर्र झाला असताना म्हणतो. हे उद्‌गार सूचक आहेत. त्यात मोठा अर्थ भरलेला आहे. देव अस्तित्वात नसेल, परंतु नसून चालणार नाही; माणसाचे जीवन खऱ्याखुऱ्या अर्थाने निर्भय, स्वतंत्र आणि समाधानी व्हायचे असेल तर देवाचे असणे ही गरज आहे असा असहाय पण अपरिहार्य सूर दस्तएवस्कीत वारंवार उमटतो. त्याला अंतिम मोलाचा वाटतो तो माणूस, आणि सुरुवातीस मोलाचा वाटतो तो माणूसच. दस्तएवस्कीत देव हा मध्ये कोठेतरी येतो आणि तोही श्रद्धावान माणसांच्याच रूपाने; प्रत्यक्ष नव्हे.

माणसांमध्ये व्यग्र असल्याने, दस्तएवस्कीत अनेक प्रकारची, अनेक स्वभावांची माणसे विविध नमुन्यांची आणि उदाहरणादाखल म्हणून येत नाहीत; तर अस्तित्व, मानवी समस्या, घडणारे प्रसंग यांना जन्म देणारी म्हणून आणि त्यांच्यामुळेच सोसावे लागणारी म्हणून अपरिहार्यपणे येतात. चॉसरच्या कँटरबरी-यात्रेत विविध प्रवासी जसे एकत्र येतात तसे नाहीत. त्यांचे एकत्र असणे एकमेकांवर सतत आणि गुंतागुंतीचा परिणाम करीत राहते. येथे माणूस हा साधन म्हणून नसतो, तर साध्य म्हणून येतो. साध्य-साधनविवेक त्यांच्यापुढे लंगडा ठरतो, कोलमडून पडतो. त्यामुळे लहानसहान व्यक्तिरेखासुद्धा जिवंत आणि रसरशीत ठरतात आणि लहानसहान प्रसंग स्फोटक ठरतात. प्रत्येकाचे 'तेथे असणे' अर्थपूर्ण ठरते.

जीवनापेक्षादेखील दस्तएवस्कीला मानवी जीवनाची कदर होती आणि मानवी जीवनापेक्षाही माणसाची कदर जास्त होती हे खरे. याचा अर्थ माणसाविषयी त्याला केवळ प्रेम वाटत होते, असे नव्हे. माणसाविषयी त्याला तिरस्कार आणि द्वेषदेखील वाटत होता. हे प्रेमद्वेषाचे संमिश्र नाते होते. एखाद्या प्रेयसीला प्रियकराविषयी मत्सर व द्वेष वाटतो, परंतु तरीही ती त्याच्यावर अपरिहार्यपणे प्रेमच करीत राहते त्याप्रमाणे दस्तएवस्कीचे आहे. वितळणारा, विघटित होणारा, चुकणारा माणूस दस्तएवस्कीत परमोच्च (Absolute) बनल्यासारखा होतो. वर्ड्स्वर्थमध्ये जसा 'निसर्ग'

अनुक्रमणिका

तुकारामात जसा 'विठ्ठल' तसा दस्तएवस्कीत 'माणूस' केंद्र ठरतो, एक श्रद्धाच ठरतो.

ख्रिश्चॅनिटीचा डोग्मा श्रद्धा, आशा आणि प्रेम हा; आणि स्वातंत्र्य, समता, बंधुता हा फ्रेंच क्रांतीचा डोग्मा– दोन्हीही दस्तएवस्कीसमोर होते. त्याच्यावर दोन्हींचे संस्कार झाले आणि दोन्हीही त्याने त्याच्यापरीने मानले. परंतु त्याचा 'माणूस' त्यांच्यासमोर लहान होत नाही की, त्यांच्याकडे वाटचाल करतोय असे दिसत नाही. त्यांच्या वेदीवर प्राणार्पण करणे किंवा बळी जाणे तर दूरच. ही मूल्ये आणि त्याची माणसे एकमेकांशी झगडत राहतात. एकमेकांचे होण्याचा प्रयत्न करतात.

'माणूस' हा शब्दच दस्तएवस्कीच्या संदर्भात अर्थाची वलये आणि तेजाची झळाळी घेऊन उठतो. युरोपीय वाङ्मयातदेखील युरिपिडीस किंवा शेक्सपीयरसारखे तुरळक अपवाद सोडले तर माणूस या शब्दावर दस्तएवस्कीएवढा हक्क कोणाचा आहे ? Proper study of mankind is man असे अलेक्झांडर पोप रास्तपणे म्हणतो. परंतु माणूस नावाच्या झंझावाताला दस्तएवस्की व्यासाप्रमाणेच सामोरा जातो.

देव, राजा, महापुरुष यांच्यावरील विश्वास परिस्थितीमुळे ढासळून तो सामान्य माणसावर केंद्रित होतो आहे याची बिथरवून टाकणारी चाहूल दस्तएवस्कीत लागते. दस्तएवस्कीच नव्हे तर आपणही माणसाच्या तावडीत सापडतो आहोत असे वाटू लागते. उत्स्फूर्तपणे स्वीकारलेल्या बांधिलकीचे रूपांतर एका चक्री वादळात होते.

ज्या माणसाला दस्तएवस्कीने मोठे केले आहे तोच माणूस दस्तएवस्कीला मोठेपणा प्राप्त करून देतो.

फ्योदोरोविच कारामाझोफ उतार वयातदेखील स्वतःची द्रव्यलालसा आणि कामवासना आवरू शकत नाही. मित्त्या कारामाझोफ वडिलांच्या खुनाचे विचार मनात वागवतो आणि ग्रूशेंकाच्या प्रेमाने संपूर्ण बेभान होतो. इव्हान दुष्ट व्यक्तीचा खून करणे कसे न्याय्य ठरते याचे तत्त्वज्ञान मांडतो. स्मेर्द्याखोफ सुप्त अन्यायभावनेपोटी प्रत्यक्ष खून करतो, आणि पुढे आत्महत्याही करतो आल्योशा इव्हानला प्रेमस्वरूप ईश्वराची आठवण करून देतो आणि मित्त्याच्या 'पुनरुत्थाना'ची काळजी वाहतो.

परंतु लिट्ल् इल्युशाच्या दफनप्रसंगी जमलेली मुले ? ती विलक्षण कोल्या ? ते आयुष्यभर एकमेकांशी खेळीमेळीने बंधुभावाने वागण्याची शपथ वाहतात आणि ...... कारामाझोफ कुटुंबाचाच त्रिवार जयजयकार करतात. आल्योशाच्या रूपाने साऱ्या गुणदोषांसकट कारामाझोफ कुटुंबालाच आनंदाने स्वीकारतात. माणसालाच स्वीकारतात आणि माणुसकीचेच व्रत घेतात.

या जयजयकारात सहभागी व्हायचे की नाही हा प्रश्नही खरे म्हणजे उरलेला नाही



अनुक्रमणिका





# कृतज्ञ अभिनंदन !

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ह्यांनी २७ जानेवारी १९८५ रोजी वयाच्या ८५ व्या वर्षात पदार्पण केले.

ह्या दीर्घ आणि व्यासंगाला वाहिलेल्या आयुष्यात त्यांनी महाराष्ट्राला आणि भारताला जे संपन्न आणि विविधांगी विचारधन दिले ते केवळ अतुलनीय आहे.

त्यांचे गुरू ब्र. केवलानंद सरस्वती ह्यांनी ज्या प्रेरणेने प्राज्ञपाठशाळा मंडळाची स्थापना केली ती तर्कतीर्थांच्या ज्ञानसाधनेच्या आणि सामाजिक कर्तृत्वाच्या रूपाने साकार आणि सफल झाली. साचून राहिलेल्या आणि क्षीण झालेल्या हिंदू परंपरेला गतिमान आणि जोमदार करण्याची, आधुनिक ज्ञान आणि सार्वत्रिक मानवी मूल्ये ह्यांच्या आधारे तिची चिकित्सा करून तिच्यात जे गतार्थ होते त्याचा त्याग करण्याची आणि जे चैतन्यशील आणि चिरंतन होते त्याला अनुसरून सामाजिक पुनर्रचना करण्याची ही प्रेरणा होती. ह्यामुळे परंपरेच्या कुंपणात बंदिस्त होऊन पडलेला हिंदू समाज मुक्त होणार होता, स्वतःचे सांस्कृतिक वैशिष्ट्य न गमावता नव्याने घडत असलेल्या भारतीय समाजात आणि व्यापक मानवी समाजात विलीन होणार होता. एक स्वायत्त कर्ता समाज म्हणून इतर समाजांशी, बरोबरीच्या नात्याने, सांस्कृतिक देवाणघेवाण करू शकणार होता; आपल्या परिष्कृत आणि पृथगात्म संस्कृतीचे मानवी संस्कृतीला योगदान करू शकणार होता.



रविवार दि. २० जानेवारी १९८५ रोजी वाई येथे
तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा श्री. पु. ल. देशपांडे सत्कार करताना.

अनुक्रमणिका

ह्यासाठी जीवन ज्ञानसाधनेला वाहिलेले असणे आवश्यक होते आणि ज्ञान सामाजिक पुनर्रचनेसाठी कामी लावणे आवश्यक होते.

तर्कतीर्थांनी प्राज्ञपाठशाळेत पारंपरिक भारतीय शास्त्रांचे केलेले व्यापक आणि सखोल अध्ययन, इंग्रजी शिकून पाश्चात्त्य तत्त्वज्ञान आणि सामाजिक शास्त्रे ह्यांचा त्यांनी केलेला व्यासंग, प्रथम स्वामी केवलानंद सरस्वती यांच्या नेतृत्वाखाली आणि नंतर स्वतंत्रपणे सनातनी धर्मशास्त्रज्ञांबरोबर धर्मपरिवर्तनाचे समर्थन करण्यासाठी त्यांनी केलेले शास्त्रार्थ, महात्माजींच्या अस्पृश्यताविरोधी आंदोलनातील गांधीजींचे धर्मशास्त्राविषयाचे प्रमुख सल्लागार ही त्यांची भूमिका, हिंदू धर्म परिवर्तनशील होता ह्या ऐतिहासिक सिद्धान्ताच्या समर्थनासाठी त्यांनी केलेली धर्मकोशाची रचना, स्वातंत्र्यलढ्यातील त्यांचा सक्रिय सहभाग, पूर्वास्पृश्य धरून सर्वांना खुले असणाऱ्या स्वरूपात प्राचीन सोमनाथ मंदिराचा त्यांच्या अध्वर्युतेखाली झालेला जीर्णोद्धार, जोतिबा फुले ह्यांच्या विचाराचे त्यांनी केलेले पुनरुज्जीवन, साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष म्हणून मराठीला आधुनिक ज्ञानाचे माध्यम हे स्वरूप मिळवून देण्यासाठी त्यांनी योजिलेले कार्यक्रम, विशेषत: त्यांचा मराठी विश्वकोशाचा प्रकल्प हे त्यांना प्राज्ञपाठशाळा मंडळाकडून लाभलेल्या आणि त्यांनी जोपासलेल्या प्रेरणेचे आविष्कार असून तिच्या परिपूर्तीची रूपे आहेत. भारतीय राष्ट्रवादापासून मार्क्सवादापर्यंत आणि नंतर मानवेंद्र रॉय ह्यांच्या सोबतीने नवमानवतावादापर्यंत त्यांनी केलेल्या वैचारिक प्रवासामागेही हीच उत्कट आणि सदैव टवटवीत असलेली प्रेरणा आहे.

त्यांच्या असाधारण बौद्धिक प्रतिभेमुळे हे अनेकांगी कार्य त्यांना साधता आले. संकल्पनांचा नेमका आशय आणि अभिप्राय स्पष्ट करण्यासाठी आवश्यक असलेला तार्किक काटेकोरपणा हे जसे ह्या प्रतिभेचे वैशिष्टय आहे, त्याचप्रमाणे त्यांच्या अंतरंगात शिरण्यासाठी आणि मानवी संवेदनेला आणि आचारांना त्या नेमके कोणते वळण देतात ते हेरण्यासाठी आवश्यक असलेली रसिक कल्पनाशक्ती हे तिचे दुसरे वैशिष्टय आहे.

त्यांच्या वाढदिवसाच्या निमित्ताने झालेल्या एका सत्कारप्रसंगी त्यांनी असे उद्गार काढले की, ' मी यापुढे कोणतेही संकल्प सोडणार नाही; पण ज्या मार्गाने मी घडत आलो त्याच मार्गाने माझी पावले पडत राहतील. ' जी साधकाची साध्ये असतात ती सिद्धाची लक्षणे असतात. आज त्यांचा मार्ग त्यांना भारतीय तत्त्वज्ञानाच्या, विशेषत: त्यातील आध्यात्मिक-नैतिक आशयाच्या चिकित्सक परिशीलनाकडे नेतो आहे. वैज्ञानिक पद्धती आणि भौतिक विज्ञाने, व्यक्तिवाद, वैज्ञानिक तंत्रांवर आधारलेले, अमर्यादपणे वाढत जाणारे उत्पादन ह्यांच्यावर उभारलेल्या ' आधुनिक ' जीवनसरणीच्या मर्यादा आज स्पष्ट झाल्या आहेत. आणि तिच्यातील खोल दोषांवरील तोडगा आपल्याकडे आहे असे मानणाऱ्या मार्क्सवादातील उणिवा आणि विकृती ह्याही स्पष्ट झाल्या आहेत. युरोपचे जगावरील आर्थिक व सांस्कृतिक प्रभुत्व ओसरण्याला प्रारंभ झाला असताना युरोपीय विचारवंत पाश्चात्त्येतर संस्कृतींकडे आदराने व आशेने पाहू लागले आहेत. ह्या घडीला भारतीय तत्त्वज्ञानाचा मानवी जीवनाच्या मध्यवर्ती प्रश्नांच्या संदर्भात सम्यक अर्थ लावण्याच्या प्रयत्नाला अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झाले आहे आणि हे काम तर्कतीर्थांएवढ्या अधिकारी वाणीने करणारी दुसरी व्यक्ती आज सापडणे कठीण आहे.

**मे. पुं. रेगे**



# धर्मकोश हीरकमहोत्सव

ना. बा. मराठे

धर्मकोश या आन्तर्राष्ट्रीय कीर्ती मिळालेल्या प्रकल्पाला सुरुवात होऊन १९८५ मध्ये साठ वर्षे पुरी होत आहेत. त्या निमित्ताने प्रकल्पाचे मूळ संयोजक ब्रह्मर्षी केवलानंदसरस्वती ( पूर्वाश्रमीचे पं. नारायणशास्त्री मराठे ) ह्यांच्या पुण्यतिथीच्या दिवशी ( फाल्गुन शुद्ध सप्तमी, फेब्रुवारी २७, १९८५ ) धर्मकोशाच्या हीरक महोत्सवास प्रारंभ होत आहे.

आतापावेतो धर्मकोशाचे तीन खंड १३ भागांत प्रकाशित झाले असून संस्कारकाण्डाच्या चौथ्या खंडाचे ४ भाग आतापर्यंत प्रसिद्ध झाले आहेत. ५ वा भाग प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

## धर्मकोशाचे जागतिक महत्त्व

संस्कृत भाषेला आणि त्यातील वाङ्मयाला गेल्या दोन शतकांत ( इ. स. १७८४–१९८४ ) जागतिक महत्त्व येऊ लागल्याने धर्मकोशाला आंतर्राष्ट्रीय मान्यता मिळू लागली आहे. याचे महत्त्वाचे कारण म्हणजे त्यात संकलन केल्या गेलेल्या, हिंदूंच्या धर्मग्रंथांची वचने. प्राचीन भारतीय कायदा, प्राचीन भारतीय राजनीती, प्राचीन भारतीय तत्त्वज्ञान आणि हिंदू धर्मशास्त्रात सांगितलेले संस्कार या चार विषयान्तर्गत उपलब्ध साऱ्या संस्कृत ग्रंथांचे ऐतिहासिक कालक्रम ठरवून सुमारे दोन-अडीचशे ग्रंथांतील वचनांचे विषयवार संकलन यांत केले आहे.

सध्या जुने संस्कृत ग्रंथ सहसा उपलब्ध होत नाहीत; पण उपलब्ध असलेल्या ( मुद्रित व हस्तलिखित ) ग्रंथांचा वापर करून हा जुन्या भारतीय वाङ्मयात आलेल्या हिंदूसमाजरचनेच्या वाङ्मयाचा एक अभिनव ज्ञानकोशच आहे.

एकोणिसाव्या शतकात शब्दकल्पद्रुम, वाचस्पत्यम् सारख्या प्रकल्पांना आकार आला खरा; पण त्यांत फक्त 'शब्द' घटक मानून जुन्या वाङ्मयातून त्या शब्दाशी संबंधित संस्कृत वाङ्मय एकत्रित संकलित केले गेले. पुणे येथील डेक्कन कॉलेजने चालविलेला 'संस्कृत कोश' हाही असाच 'शब्द' घटक मानून इ. स. १९५० पासून चाललेला प्रकल्प आहे.

धर्मकोशकार्य इ. स. १९२५ पासून सुरू झाले आणि यात 'शब्द' हा घटक न मानता 'विषय' हा घटक मानून तत्संबंधीची संस्कृत वाङ्मयातील सारी वचने संकलित केली आहेत. उदाहरणार्थ : 'विवाह' या विषयाशी संबद्ध गृह्यसूत्रे, धर्मसूत्रे, मन्वादी स्मृती, मेधातिथी, अपरार्कादी भाष्यकार आणि नंतरचे धर्मसिंधूपर्यंतचे निबंधकार– या सर्वांनी लिहिलेल्या वाङ्मयाचा अंतर्भाव यात एकाच प्रकरणात मिळतो. त्यामुळे धर्मकोश हा मूलभूत संदर्भग्रंथ म्हणून जगात मान्यता पावला आहे.

या मान्यतेमुळेच संपूर्ण धर्मकोशाचा इंग्रजी अनुवाद करून देऊ अशी इच्छा पाश्चात्त्य भारतीय-विद्यातज्ज्ञांकडून व्यक्त करण्यात आली आहे. लौकरच साऱ्या जगाला या भारतीय अमोल ज्ञानसंग्रहाचा इंग्रजीतून अनुवाद उपलब्ध होईल. विसाव्या शतकात तयार होत असलेल्या 'भारतीय विद्या' विषयात हा एक अमोल ग्रंथ म्हणून उल्लेखिला जाईल यात शंका नाही.

मुळात संस्कृत असल्याने सध्या तरी फक्त संस्कृत जाणणाऱ्यांपुरताच याचा वाचकवर्ग आहे असे दिसते. गेली ६० वर्षे हे कार्य अखंडपणे चालू आहे. गेली ५२ वर्षे ( इ. स. १९३३ पासून ) पं. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी हे या प्रकल्पाचे संपादन करीत आहेत. 'विश्वकोश' या मराठी भाषेतून निघणाऱ्या ज्ञानकोशाचे ते मुख्य संपादक आहेत. कोशकार्य हे इतर ग्रंथांप्रमाणे त्वरित फल देणारे कार्य नसते. त्याचा महिमा युगानुयुगे चालू राहतो. आचार्य

अनुक्रमणिका






वसुबंधूंनी प्राचीन काळी संकलित केलेल्या अभिधम्मकोशाचे अनन्यसाधारण महत्त्व आजतागायत कायम आहे. ज्ञानकोशकार केतकरांचे कार्य कुणाच्या लक्षात राहणार नाही ?

धर्मकोशाचे अजून बरेच कार्य बाकी आहे. वर्णाश्रमधर्मकाण्ड या पाचव्या खण्डाचे काम सध्या चालू असून त्याचेही चार-पाच भाग होतील एवढी सामग्री संकलित झाली आहे. यात ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार वर्णांच्या धर्माची व ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास ह्या चार आश्रमधर्मासंबंधीची संस्कृत वाङ्मयात असलेली समग्र माहिती यावयाची आहे. ऐतिहासिक पद्धतीने कालक्रम ठरवून विषयवार वचनांचे संकलन करण्याचे काम पूर्वीच्या चार खण्डांप्रमाणेच चालू आहे. ते पूर्वनियोजित संकल्पनेनुसार योग्य काळी प्रसिद्ध होईल.

या कार्याला फार मोठे आर्थिक साहाय्य लागते. फोर्ड फाउंडेशन, भारत सरकार व महाराष्ट्र राज्य सरकार या प्रकल्पाला आर्थिक साहाय्य देत आहेत. पण सध्या जीवनमानाचा रथ घोडदौड करीत भरधाव चालत असल्याने कितीही दिलेली मदत अपुरीच राहते.

या आन्तरराष्ट्रीय कीर्तीच्या प्रकल्पाचे महत्त्व जाणून धनिकांनीही भरीव आर्थिक साहाय्य करावे असे या निमित्ताने आवाहन करावेसे वाटते.









अनुक्रमणिका

# अक्षरवेध

**गोदातटीचे कैलासलेणे**– (कै. नरहर कुरुंदकर स्मृतिग्रंथ)– मराठी साहित्य परिषद आंध्र प्रदेश, इसामिया बाजार, हैदराबाद– ५०० ०२७; १९८३; पृ. ५७२; किं. १०० रुपये.)

'नक्षत्रांचे देणे' या कवितेत आरती प्रभू म्हणतात–

संपूर्ण तरु की आहे नगण्य पर्ण
सांगेल राख माझी गेल्यावरी जळून

या कवितेची कुरुंदकरांच्या संदर्भात तीव्रतेने आठवण होते. अचानक कुरुंदकर निधन पावले, पण त्यांनी आपल्या मृत्यूनंतर ह्या ओळींच्याच आशयाचा प्रत्यय दिला. केवळ मराठवाड्यात नाही तर संपूर्ण महाराष्ट्राच्या ओठावर 'कुरुंदकर' हा शब्द सतत होता. क्षणात नाहीशा होणाऱ्या दिव्य भासाप्रमाणे ही व्यक्ती नाहीशी झाली. असं म्हणावसं वाटतं की, मृत्यूतील या अचानकतेमुळे यशाच्या सर्वोच्च बिंदूवर असताना सर्वांना रुखरुख लावून ते गेले. अनुभवाच्या स्मृती अधिक ठळक झाल्या. अशाच काही स्मृतींना घेऊन तयार झालेला 'गोदातटीचे कैलासलेणे' हा स्मृतिग्रंथ, प्रत्येकास दिसलेले, जाणवलेले, अनुभवास आलेले असे कुरुंदकर या लेखांच्या स्वरूपात पुन्हा एकदा वाचकांना शब्दरूपाने दिसतात. या भूमिकेतून पाहता या स्मृतिग्रंथाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. साहित्यिक–समीक्षक कुरुंदकर आणि ह्या दोन्ही भूमिकांच्या पलीकडचे कुरुंदकर... लौकिक व अलौकिक अशा दोन्ही भूमिका साकार करणारे कुरुंदकर समोर येतात. सामान्यांत सामान्यांसारखे राहताना आपले असामान्यत्व स्वयंभूपणे सिद्ध करणाऱ्या कुरुंदकरांचे असामान्यत्व ते गेल्यावर लक्षात आले. पानवाल्यापासून ते मंत्र्यापर्यंत 'कुरुंदकर सरां'चा वावर होता. तरीही कोणत्याच भूमिकेत अयशस्वी न झालेला हा कलावंत तिसऱ्या अंकापूर्वीच पडद्याआड झाला. या स्मृतिग्रंथात पहिल्याच लेखात कुरुंदकर पिता व पुत्र यांच्या व्यक्तिरेखा रेखाटल्या आहेत. पुत्रदुःख पचविण्याचे असामान्य सामर्थ्य असणाऱ्या ह्या पित्याचा पुत्रही तेवढ्याच ताकदीचा. एका भावनिक आत्मीयतेतून ह्या लेखाचे लिखाण झाले आहे. "दुसऱ्याच्या हृदयात ज्याला स्थान आहे त्याच्या मृत्यूलाही सोहळ्याचे पावित्र्य येते" हे लेखकाचे मत खरे आहे. पित्याच्या मोठेपणाचा वारसा घेतलेल्या पुत्राच्या मोठ्या मनाची जडणघडण या लेखातून स्पष्ट होते. व्यक्तिगत जीवनातील घटनांची नोंद करीत असतानाच त्यांची सामाजिक प्रतिमा स्पष्ट झाली आहे. प्रौढ कुमारिकांचे शिक्षणवर्ग घेणे, सेवादलात बौद्धिक देणे, गणेश-मंडळाची व्याख्याने ह्या उद्योगांचे सातत्याने अवलंबन आपल्या लहानशा गावात आल्यावरही त्यांच्याकडून होत असे. त्यांच्या वाणीची भूमिका ह्या लेखातून स्पष्ट होते.

'आनंदाचे आवरू' मांडणारे कुरुंदकर म्हणून डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांनी आपली व्यक्तीबद्दलची तात्त्विक भूमिका दुसऱ्या लेखात मांडली आहे. नवीन गोष्ट शिकण्याची आसक्ती असणारे कुरुंदकर, आगळ्यावेगळ्या गुरुकुलाचे दर्शन घडविणारे कुरुंदकर, अखंड ज्ञानयज्ञ सुरू ठेवणारे कुरुंदकर, डोळे उघडे ठेऊन जगाचा अनुभव घेणारे कुरुंदकर, ज्ञानलालसा असणारे कुरुंदकर अशा विविध भूमिकांचा परामर्श या लेखात घेतला गेला आहे. कुरुंदकरांची असामान्यता म. म. दत्तो वामन पोतदार यांनीही गौरविली होती– "कुरुंदकर हा आपल्या अंगच्या वैभवानेच गाजतो, गर्जतो आहे. मराठवाड्याचा अभिमानी, बुद्धिमान, विवेचक, समर्थ, नाव काढलेला आणि पुढे काढील..."

श्री. अनंतराव भालेरावांच्या लेखातून कुरुंदकर या व्यक्तिमत्त्वाच्या राहणीबद्दल जे अनेक प्रश्न









समाजाला होते त्या प्रश्नांचा विचार झाला आहे. भीडभाड, शिष्टाचार आणि मर्यादा या गोष्टी आपल्या गावी नसलेले कुरुंदकर ते उभे करतात. वाङ्‌मयीन जीवनात अस्खलित, मूलभूत तर्कशुद्ध विवेचन करणाऱ्या कुरुंदकरांना जीवनात सुसूत्रता, रचना व व्यवस्था यांचे वावडे. रूढ चाकोरी उखडण्यात कुरुंदकरांना रस आहे ,असे अनुमान काढावे, तर अनेक बाबतीत जुन्या चाकोरीचे ते भक्त ! 'हा माणूस असामान्य बुद्धिमान खरा, पण तेवढाच आगाऊ आहे ' हे भालेरावांनी सांगितलेले भविष्य वेगळ्या संदर्भात कुरुंदकरांच्या बाबतीत सत्य आहे. रूढ जीवनात केवळ विलक्षण वाटावे असे हे व्यक्तिमत्त्व होते. प्रांजळपणा, ध्येयासक्ती आणि दानत ही अस्सल होती. आत्मकेंद्रिततेपासून अलिप्त राहिलेला हा माणूस अशा अनेकांगांनी श्री. अनंतराव भालेराव यांनी कुरुंदकरांचा करून दिलेला परिचय महत्त्वपूर्ण वाटतो.

'अर्ध्या वाटेवरचा एक प्रवास ' संपविणाऱ्या या व्यक्तीबद्दल डॉ. यू. म. पठाण यांनी एक समीकरण मांडले आहे– नांदेड म्हणजे कुरुंदकर आणि कुरुंदकर म्हणजेच नांदेड. हे एक समीकरण असले, तरी मराठवाडा म्हणजे कुरुंदकर नि कुरुंदकर म्हणजेच मराठवाडा असेही एक समीकरण रूढ झाले होते. 'गुरुजी ' शब्दाचा अर्थ कुरुंदकर एवढाच. कुरुंदकरांची व्याप्ती त्यांनी या लेखातून सांगितली आहे. ह्या समीकरणास वेगळा नि महत्त्वाचा संदर्भ आहे. " साहित्यापासून संगीतापर्यंत, महाभारतापासून भरताच्या नाट्यशास्त्रापर्यंत, महात्माजींपासून आझाद-नेहरूंपर्यंत, महाराष्ट्र साहित्यपरिषदेपासून मराठी साहित्य महामंडळापर्यंत अशी अमर्याद व्यापकता ह्या माणसाच्या बुद्धिमत्तेची होती. लहानमोठ्या कोणत्याही ठिकाणी मनाची प्रगल्भता घेऊन ते जात. व्याख्याने देणे ही त्यांची वेगळी भूमिका होती. व्याख्यानाच्या रूपाने ते अनेक ठिकाणी फिरत नि फिरता फिरता वाटेवरचे अनेक प्रवासी ह्या वाटसरूचे शिष्य बनत. लोकांना धक्कादायक वाटतील असे अनेक विचार वेळोवेळी कुरुंदकरांनी आपल्या व्याख्यानांतून मांडले. पण लोकांना काय वाटेल म्हणून विचार मांडायचे ते कधी थांबले नाहीत. ह्याचे कारण म्हणजे स्वतःच्या विचाराबद्दल त्यांना स्वतःला असणारा आत्मविश्वास ! कितीतरी माणसे, त्यांची आयुष्ये त्यांनी उभी केली. या लेखात आणखी एक विशेष व्यक्त होतो. तो म्हणजे त्यांच्या सहवासाची ऊब व लोभसवाणेपणा ! एरवी वक्रोक्तिपूर्ण बोलणारे कुरुंदकर मित्रमैत्रिणींच्या सहवासात अगदी हरवून जात.

शबनमला त्यांच्या खांद्यावर वेगळी शोभा होती. ह्या शबनमच्या ( पिशवी ) देवाणघेवाणीतून निर्माण झालेल्या सहवासाबद्दल आनंद साधले यांनी 'क्षणशः कणशश्चैव ' या लेखात विचार मांडले आहेत. तसा कथात्मक स्वरूपाचा हा ललित लेख. त्यांचे मठाधिपती म्हणून रूप वेगळे होते. गावोगाव त्यांचे चेले होते. विषय जुना असला, तरी त्या विषयाकडे पाहण्याची त्यांची दृष्टी नवी होती. म्हणून टिळक, खांडेकर, कालिदास, निजामशाही यांबद्दलचे त्यांचे विचार महत्त्वपूर्ण वाटतात, ते भिन्न आहेत; कारण त्यांच्या चिंतनातील स्वतंत्रता ! त्यांची विद्वत्ता उद्धट होती; स्वभाव नाही. कुरुंदकरांची 'व्यासंगी अभ्यासका'ची प्रतिमा ह्या लेखात स्पष्ट होते. 'मित्र ' म्हणून त्यांची भूमिका खूप गुंतागुंतीची होती. अशा या मित्राच्या मैत्रीचे दर्शन 'ॐ मित्राय नमः ' ह्या द. पं. जोशी यांच्या लेखातून होते. विचाराइतकेच विचारपद्धतीचे त्यांना आकर्षण वाटायचे. अभिनवगुप्ताचा अलौकिकवाद, शांतरसाच्या प्रस्थापनेत ज्ञानेश्वरांना साहाय्यभूत झालेले काव्यशास्त्र, राधाकृष्णन, दासगुप्ता व रसेल हे सारे चिंतनविषय असणाऱ्या कुरुंदकरांचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या विचारांचा सपाटा. त्यांचे अनेकपैलू व्यक्तिमत्त्व व्यक्त करताना प्रा. जोशी म्हणतात, " कुरुंदकरांची वाणी संवाद बोलत होती साहित्याचे, युक्तिवाद सांगत होती तत्त्वज्ञानाचे... त्यात राजकारणाचा तत्त्ववाद होता, समाजवादाचा अर्थवाद होता, काव्यशास्त्राचा नीतिपाठ होता." मैत्रीचा एक नवा सिद्धांत त्यांनी मांडला होता.

'गुरुजी ' ह्या शब्दाचाही अर्थ मराठवाड्यात कुरुंदकर हा होता. बाबू रुद्रकंठवार या साहित्येतर क्षेत्रातील व्यक्तीने गुरुजींची वेगळी प्रतिमा निर्माण केली आहे. सामान्यांत कुरुंदकर सामान्य होऊन राहत. चिंतन व मननापुढे झुकणारे गुरुजी, कामात



अनुक्रमणिका

तत्पर असणारे गुरुजी, व्यक्तिगत कामासाठी सेवकांना राबवून न घेणारे गुरुजी, व्यासंगी गुरुजी, सर्व माणसांच्या सुखदु:खांशी समरस होणारे गुरुजी व्यक्त झाले आहेत. या लेखाच्या शेवटचे उद्गार फार मार्मिक वाटतात– "कुरुंदकरांना तुमच्या चष्म्यातून पाहू नका, जसे कुरुंदकर होते तसे ठेवा."

श्री. यदुनाथ थत्ते यांचा लेख कुरुंदकरांकडे एका राजकीय भूमिकेतून बघतो. एका पक्षनिष्ठ माणसाने दुसऱ्यातला पक्षनिष्ठ नेमका टिपून घेतला आहे. छेड काढणे नि कुचुंद्या करणे ही कुरुंदकरांच्या स्वभावातील दोन वैशिष्टचे होती. राष्ट्र सेवादलातील अनेक तरुणांच्या घरगुती वातावरणातील जीवनातील ते एक सहकारी होते. कुरुंदकरांचा समाजप्रबोधक म्हणून परिचय करून देताना श्री. देऊलगावकर म्हणतात, "कुरुंदकरांमुळे मराठवाड्याचा महाराष्ट्राला नव्याने परिचय झाला. मराठवाड्यावर मागासलेपणाचे शिक्कामोर्तब करून पुण्यामुंबईकडची बरीच मंडळी मराठवाड्याकडे उपेक्षेच्या नजरेने पाहत आणि या उपेक्षेचे रूपांतर आमची योग्य दखल घेण्यापर्यंत करण्यात मराठवाड्यातील ज्या व्यक्ती कारणीभूत ठरल्या त्यांत कै. कुरुंदकरांची प्रामुख्याने गणना केली पाहिजे."

कुरुंदकरांचा पत्रव्यवहार दांडगा होता. ते रोज किती पत्रे लिहीत असत ! आळस न करता, कंटाळा न करता. याचा उत्कृष्ट नमुना म्हणजे कुरुंदकरांनी डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांना लिहिलेले पत्र होय. समीक्षक कुरुंदकर, साहित्यिक कुरुंदकर, राजकारण–धर्मकारण–समाजकारण यांतील कुरुंदकर, वादसंवाद साधणारे कुरुंदकर, लेखक कुरुंदकर यांपेक्षा कुरुंदकर व्यक्ती म्हणून कसे होते हे अधिक समजणे आवश्यक होते. हे वरील सर्व लेखांतून व्यक्त होते. म्हणून 'गोदातटीचे कैलासलेणे' या पुस्तकातील 'नरहर कुरुंदकर यांचे राजकीय चिंतन', 'इहलोकवाद आणि कुरुंदकर', 'कुरुंदकरांची दलित साहित्य विषयक भूमिका' इ. अनेक लेख या ठिकाणी विचारात घेतलेले नाहीत. हे लेख निश्चितच महत्त्वपूर्व आहेत. ह्या भूमिकेतले कुरुंदकर माहिती आहेत, चर्चेचा विषय झाले आहेत.

गोदातटीच्या कैलासलेण्याची कलेच्या भूमिकेतून मीमांसा सर्वत्रच होत गेलेली आहे, त्यावर आक्षेप घेतले गेले आहेत, तो वादाचा मुद्दा झाला. पण ह्या कलेतला माणूस कसा होता याचे दर्शन या ग्रंथात होते. कारण अनेक लेखकांनी आपले व्यक्तिगत अनुभव ह्या लेखांतून व्यक्त केले आहेत. तसं पाहिलं तर हा माणूसच मुळी सापडून हरवल्यासारखा वाटणारा ! सहवासातल्या माणसाने पुन्हा त्याला शोधायला निघावे असा ! यातून निर्माण होत असतात अधिक दृढ संबंध. खरंच एखादी कलाकृतीच अशी असते जी किती वेळा अनुभवली तरी समाधान होत नाही. या 'गोदातटीच्या कैलासलेण्या'चे असेच होते. पण दुर्दैव असे, की नियतीने हे संपूर्ण कैलासलेणेच आपल्या पोटात गिळंकृत केले. कदाचित न जाणो प्रत्यक्ष मृत्यूलाही मोह झाला असेल ह्या माणसाशी मैत्री करावी असा ! कुणी सांगावं ?

**–प्रतिभा केकसर**

---

**दिनकरराव जवळकर समग्र वाङ्मय :** संपा. डॉ. य. दि. फडके, प्रकाशक म. जोतीराव फुले समता प्रतिष्ठान, ७३ नाना पेठ, पुणे; पृष्ठे ३४०, किं. साठ रुपये.

---

ख्यातनाम संशोधक श्री. य. दि. फडके यांनी केशवराव जेधे यांचे चरित्र उपलब्ध केल्यानंतर, 'समग्र जवळकर' संपादित केले आहेत. अल्पायुषी झालेले जवळकर एक देखणे तरुण होते. मुखपृष्ठावरील त्यांचा फोटो ज्यांनी त्यांना पाहिले नाही, अशांना त्यांचे दर्शन करून देतो. मोठे तरतरीत, उत्साही, बाणेदार, प्रभावी व आक्रमक असे त्यांचे व्यक्तिमत्त्व होते. अर्थात तितक्याच प्रमाणात ते वादनिर्माते व वादग्रस्त झाले.

म. फुले प्रतिष्ठानचे प्रमुख व ह्या ग्रंथाचे प्रकाशक, यांची सोळा पानी प्रस्तावना प्रथम फुले प्रतिष्ठानच्या वाङ्मयीन कार्याचा अहवाल देते. श्री. फडके यांच्याच जेधे चरित्रातील माहितीत हे पुस्तक ऐतिहासिक माहितीची नवी भर घालते. कारण प्रथम 'जेधे–जवळकर' हे अद्वैत होते. सत्यशोधक–ब्राह्मणेतर चळवळ व त्यातील प्रमुख व्यक्तींच्या संबंधाने चालू नव्या पिढीला फार आकर्षण वाटते. हे पुस्तक ही भूक भागविणारे आहे. ब्राह्मणेतर चळवळ व पक्ष यांच्या उदयासंबंधी

बरीच माहिती पुढे आली आहे. १९२० ते १९३० हा सत्यशोधक चळवळीचा शेवटचा वादळी, प्रक्षोभक व घणाघाती कालखंड होय. जेधे–जवळकरांमुळे ही चळवळ डोळचांत सर्वत्र भरली, तशीच त्यांनी म. गांधीच्या चळवळीत महर्षि शिंदे यांच्या प्रेरणेने उडी घेतल्यामुळे मुख्यतः ह्यांच्या दोघांच्या मुळे व हस्ते देखील सत्यशोधक चळवळ अस्तास गेली, पुढे कॉंग्रेसमध्ये जाऊन, कॉंग्रेस काबीज करून, ती नजरेआड झाली; भूमिगत झाली. ब्राह्मणेतर राजकीय पक्षदेखील जेधे-जवळकर काळात व कालखंडात गाजला व अंतर्गत कारणांमुळेच विशेषतः लयास गेला. ही मुद्देसूद कारणे श्री. आढावांच्या प्रस्तावनेत पृष्ठ दहावर मिळतात. शाहूनिष्ट जवळकर ( व जेधे ) यांनी शाहू महाराजांच्या पश्चात वरील चळवळ सर्वत्र भरभराटीस आणली. याचे एक प्रमुख कारण म्हणजे जवळकरांची तिखट लेखणी होय. दुर्मिळ झालेली जवळकरलिखित अकरा लहानमोठी खळबळजनक पुस्तके ह्या संग्रहात पुनः छापली आहेत. 'आढाव–फडके' यांचा उद्देश जुन्या कढीला पुन्हा ऊत आणण्याचा मुळीच नाही. कारण जेधे–जवळकरांचा काळच गेला. जसाच्या तसा पुनः आवृत्त होणे, अशक्य आहे. जाणता होऊन बहुजन समाज पुढे गेला असून त्याला फुले व जवळकर यांच्यासारखी प्रक्षोभक व झोंबणारी भाषा वापरण्याची आता गरज राहिली नाही. हा संग्रह म्हणजे सत्यशोधक ब्राह्मणेतर चळवळीच्या वरील शेवटच्या कालखंडाचा इतिहास लिहिण्याचे ऐतिहासिक साधन आहे. प्रकाशक आढाव यांची सूत्रबद्ध व व्यवस्थित प्रस्तावना जवळकर व्यक्ती, चरित्र, कार्य व वाङ्मय यांची ग्रंथारंभी थोडक्यात पण चांगलीच कल्पना वाचकांना देऊ शकते. आढावांनी जवळकरांचे कर्ते चिरंजीव शिवाजीराव यांना सहाध्यायी म्हटले आहे व ह्या जवळकर कुटुंबाशी असलेली जवळीक आढाव मोठ्या सहृदयतेने सांगतात. ह्या संग्रहात "आढाव–फडके" यांच्या प्रस्तावना व 'क्रांतीचे रणशिंग' ह्या कै. बाबूराव भोसले यांनी संपादित केलेल्या पुस्तकास जोडलेले जवळकर चरित्र हे जवळकरांचे व्यक्तिमत्त्व व चरित्र यांची जरूर ती माहिती देते. (पृ. २७७) ह्यामुळे समग्र चरित्र लिहिणाऱ्यांस आधार मिळेल. चळवळीचा शेवट शाहू महाराजांनंतर झाला नाही, उलट ती भूमिती श्रेणीने पसरली.

फडक्यांची प्रस्तावना आढावांच्या माहितीत मनस्वी भर घालते. अशी एक समजूत आहे की, फुल्यांच्या निधनानंतर शाहू महाराजांच्या नेतृत्वप्राप्तीपर्यंत स. शो. चळवळ चालू नव्हती; पण ह्याही मधल्या काळात कित्येक स्वयंसेवक कार्यकर्ते झटत होते. अशा कित्येकांची नावे व त्यांचे कार्य हे प्रस्तावनेत नमूद आहे. शाहू महाराजांनंतर जवळकर (व जेधे) यांनी केलेल्या कार्यामुळे व लेखनामुळे विशेषतः जवळकर सर्व महाराष्ट्रापुढे आले. त्यांच्या निधनानंतर बावन्न वर्षे उलटल्यावर त्यांच्या वाङ्मयासह व चरित्रासह आढाव व फडके यांनी त्यांना नव्या पिढीसाठी उपलब्ध केले. याबद्दल म. फुले प्रतिष्ठानचे मराठी वाचक आभारच मानतील. फडके यांनी आधारार्थ मुख्यतः जुन्या ब्राह्मणेतर नियतकालिकांतील अनेक उतारे व संदर्भ घेतले आहेत, म्हणून विवेचन साधार झाले आहे. फडक्यांच्या आजवरच्या निःपक्षपात संशोधनीय लेखनात, हा ग्रंथ मोठी भर घालतो. केवळ गौरव–स्तुती ह्यात नाही तर हा सर्व सोपपत्तिक इतिहासच तयार झाला आहे. एवढा तटस्थ व मीमांसापूर्ण प्रयत्न सहानुभूतीने पूर्वी कोणी केला नव्हता.

जवळकर व त्यांच्या पक्षाच्या अर्वाच्य, अश्लील व शिवराळ भाषेसंबंधीचे काही समर्थन व विवेचन पान ११ वर फडक्यांनी केले आहे. टिळकपक्ष व शाहूपक्ष यांची चांगलीच जुंपल्यामुळे दोन्ही पक्ष कमीजास्त प्रमाणात वरील दोषांचे धनी झाले होते. हा काळच क्रिया-प्रतिक्रियांचा होता. महर्षी शिंदे यांनी एका ठिकाणी ह्याला ब्राह्मण-ब्राह्मणेतरांच्या 'टाळचा' असे संबोधिलेले आढळते. महाराष्ट्राच्या बहुजन समाजावर व नवजागृत ग्रामीण जनतेवर म. गांधी यांच्या राष्ट्रीय चळवळीचा व व्यक्तिमत्त्वाचा लोकमान्यांपेक्षा अधिकाधिक प्रभाव पडून, ब्राह्मणेतर पक्ष जवळकर (व जेधे) यांच्या नेतृत्वाखाली कॉंग्रेसमध्ये घुसला. म. गांधी झाले नसते तर हा जुना व दुर्दैवी वाद तसाच पुढे शापभूत होऊन चालू देखील राहिला असता. ब्राह्मणेतरांना विश्वासात घेणे, त्यांना व जवळकर यांच्या सारख्या

अनुक्रमणिका

त्यांच्या पुढाऱ्यांच्या भेटी घेणे याला टिळकांपेक्षा गांधींनी प्रत्यक्ष महत्त्व दिले.

श्री. फडके यांनी मागे जेधे यांचे सार्वजनिक चरित्र लिहिले होते व आता हा 'जवळकर' ग्रंथ जेधे ग्रंथात आणखी साधार माहितीची भर घालतो. चाळीस वर्षांपेक्षा कमी आयुष्य लाभलेले, फिरकोळ प्रकृतीचे व आर्थिक परिस्थिती चिंताजनक असताना ही व्यक्ती एवढे मोठे कार्य व प्रभावी लेखन करू शकते, याचे आजही आश्चर्य वाटते. चळवळ जवळकर यांच्या भाषणामुळे व लेखनामुळे खेडयापाडयांपर्यंत जाऊन पोहोचली. त्यांची भाषणे ऐकण्यास तुफान गर्दी जमे व त्यांचेही वक्तृत्व तुफान होते. खुद्द त्यांच्याच पक्षातील प्रथम खुद्द शाहूनंतर जागृतिकार पालेकर, मुकुंदराव पाटील ह्या पत्रकर्त्यांनी व भास्करराव जाधवांनीही यासंबंधाने खेद व्यक्त केल्याचे फडके साधार नमूद करितात (पृ. १७, २७). प्राणपणाने जवळकर तुटून पडत. ही एक तोफच होती. शिवस्मारक पुराणात बाबुराव जगताप, भास्करराव जाधव, पी. सी. पाटील वगैरेंना जवळकरांनी धारेवर धरले. जवळकर स्वपक्षात व त्यांचा प्रतीपक्षी जो ब्राह्मणसमाज यांत वारंवार अप्रिय होत. पण त्या काळातील श्रोते व वाचक यांना जवळकर हवे होते. महाराष्ट्राच्या इतिहासात हा सामाजिक-धार्मिक वादाचा कालखंड नसता, तर जवळजवळ गडकऱ्यांसारखी प्रतिभा असणारे जवळकर, गडकरी यांच्याप्रमाणे किंवा खालोखाल ज्ञात राहिले असते. जवळकरांचे 'पुण्यप्रभाव' नाटक या ग्रंथासाठी लाभले नाही; हे दुर्दैव होय. नाटककार, कवी, संपादक, लेखक, वक्ते, कार्यकर्ते व महाराष्ट्रभर व्याख्यानांचा पाऊस पाडणारे जवळकर मराठी वाङ्मयात अपूर्व झाले. जवळकर म्हणजे प्रतिपक्षाला 'शिव्या' अशी जी समजूत होती ती ह्या ग्रंथाच्या उत्तर भागाच्या साक्षीमुळे खोटी ठरते. सामाजिक स्वातंत्र्यासाठी लढणारे जवळकर तितक्याच हिरीरीने, शौर्याने राजकीय संग्रामात उडी घेते झाले व देशभक्त पदवीस पात्र झाले.

ब्राह्मणेतर पक्षाचे प्रवक्ते, राष्ट्रीय चळवळीतील स्वातंत्र्यसैनिक (डिक्टेटर), समाजवादी जवळकर, विलायतेस दोनदा जाऊन आलेले जवळकर, परिवर्तनवादी जवळकर, असे जवळकरांचे एकाच जन्मात नवे नवे जन्म झाले, याची प्रचीती फडकेसंपादित जवळकरग्रंथ चांगली देऊ शकतो. फडक्यांची भाषा सोपी आहे. परिच्छेद कुशलतेने योजिले आहेत. अनेक कागदपत्रे उपयोगात आणली आहेत.

ब्राह्मणेतर चळवळ व राष्ट्रीय चळवळ, दलितांची चळवळ व राष्ट्रीय चळवळ यांच्यामध्ये दुसऱ्या महायुद्धानंतर महर्षी शिंदे हे एक पूल बांधण्याचा अवघड प्रयत्न करीत होते. शिंदे यांचे ब्राह्मणेतर पक्षांशी जवळचे संबंध व मतभेद इत्यादी शिंदे यांच्या संबंधीची माहिती पूर्वी कोणी दिली नाही; पण असे कित्येक संदर्भ फडके यांनी दिले आहेत (पृ. १, ३८ ते ४२). जवळकर अस्पृश्योद्धाराच्या क्षेत्रातही कडवे होते. डॉ. आंबेडकर यांच्या काळाराम मंदिर सत्याग्रहात त्यांनी शौर्याने भाग घेतला.

जेधे–जवळकर संबंध व विग्रह, जेधे–भास्करराव जाधव विग्रह, जेधे–जवळकर–आंबेडकर मैत्री व मतभेद, भाऊराव पाटील ब्राह्मणेतर पक्षाच्या सरकारसामील धोरणाशी विद्रोह करितात, मराठे–मराठेतर वाद वगैरे जवळकरकालीन व संबंधित अनेक विविध घटना व प्रसंग, त्यावेळचे ब्राह्मण पुढारी, "केसरी पक्षाशी ब्राह्मणेतर पक्षांनी टिळकांच्या निधनानंतर ही दिलेली झुंज" वगैरे किती म्हणून वादग्रस्त विषय डॉ. फडक्यांनी प्रस्तावनेत थोडक्यात हाताळले आहेत. या सर्वांवरून त्यांचा सत्यशोधक–ब्राह्मणेतर चळवळीच्या ऐतिहासिक कागदपत्रांशी आलेला व त्यांनी जोडलेला आस्थेवाईक पण तटस्थ संबंध यांची चांगली कल्पना येऊ शकते. चळवळीच्या काळातील जवळकरांना पाहिलेला–ऐकिलेला–वाचलेला अशा मला, फडक्यांच्या विवेचनाशी प्रतिवाद किंवा मतभेद करणे अवघड वाटते. बहुजन समाजाच्या वतीने त्यांना धन्यवाद देणे, हे एकच सार्वजनिक कर्तव्य ठरते.

जवळकरांच्या लेखणीचे लक्ष्य टिळक व नरसोपंत हे जरी होते, तरी ब्राह्मणेतरांपैकी गुंजाळ, संग्रामकर्ते श्री. नलावडे, बाबूराव फुले यांचीही हजेरी तितक्याच तीव्र शब्दांत व कडवट भाषेत जवळकरांनी घेतली (उदा., पृ. ३). स्वतःस राष्ट्रीय म्हणविणाऱ्या केसरीपक्षीय परंपरावादी ब्राह्मणेतरांशीदेखील तितक्याच प्राणपणाने जवळकर झुंजले.








जवळकरांची बेफाम लेखणी सत्यशोधक समाजाचे मुखपत्र जे 'दीनमित्र' त्यालादेखील आवडत नसे. जवळकरांच्या मृत्युलेखातदेखील सत्यशोधक ब्राह्मणेतर 'दीनमित्राने' व 'जागृती' पत्राने त्यांची फारशी तारीफ केली नाही (पृ. ४९). अंगलट येणारी विधाने जवळकरांकडून झाली. शाहू महाराजही अडचणीत आले होते. त्यांच्या मरणानंतर जवळकर कोल्हापूर सोडून पुण्यास आले व तेथेच अकाली वारले (पृ. ४८). जवळकर आळंदी (चोराची) येथे पाटील घराण्यात इ. स. १८९८ च्या सुमारास जन्मले. पण मोठेपणी मोठे पराक्रमी ठरले.

पुण्यासही छत्रपती मेळ्यातील एका पदामुळे मारामारी झाली (फडक्यांची प्रस्तावना, पृ. ९). धनवडे प्रकरणासारखी वादग्रस्त प्रकरणे विवेचनासह फडक्यांनी वाचकांना सादर केली आहेत (पृ. २१). कठीण काम फडक्यांनी सोपे केले आहे.

जवळकरांच्या तिखट भाषणांची व लेखनाची त्यावेळची जरूरी सांगणारा एक परिच्छेद पृ. ११ वर योजला आहे. जवळकरांची भाषणे निरक्षर लोकांनाही समजत. वऱ्हाड–नागपूरकडेही जवळकरांचा संचार झाला.

जवळकरांच्या हल्ल्यांना थोपविण्यासाठी केसरी-केळकर गटाने काय काय व्यवस्था केली व बंदोबस्त करण्याचा प्रयत्न केला याचा वृत्तांत फडके यांनी दिला आहे. जेधे–जवळकर यांच्या 'मजूर' पत्राला तोंड देण्यासाठी 'संग्राम' पत्र काढावे लागले. दोन्ही पक्षांत जे तुंबळ युद्ध झाले व दोन्ही पक्षांनी जी धुळवड खेळली ह्याची हकीगत श्री. फडके प्रस्तावनेत क्रमवार व कालवार वाचकांपुढे ठेवितात. जवळकर व ठाकरे हे पुण्यातून मशिनगन्स डागत होते. ठाकरे–जवळकर यांच्यावर गडकऱ्यांच्या भाषेचा परिणाम होता. या दोघांनी प्रतिपक्षाशी भाषिक युद्ध खेळताना जोतीरावांप्रमाणे लागट-तिखट अशा आणखी कित्येक संज्ञा व शब्द स्वतः बनविले. कोकणस्थांवर व पेशव्यांवर जवळकर–ठाकरे यांनी तुफान हल्ला केला (पृ. १७). मुंबईच्या 'टाइम्स' या इंग्रजी पत्रानेदेखील जे काय पुण्यात, हे सारे चालले होते, त्या संबंधिताना तुरुंगात ठेवावे, असे सुचविले (पृ. १९,२०). 'जेधे–बागडे–जवळकर' सत्यशोधक चळवळीसाठी तुरुंगात गेलेले पहिले मोठे कार्यकर्ते. फडके पुढे पृ. २५-२६ पर्यंत खटल्या-खोकल्यांची हकीगत त्यांच्या प्रस्तावनेत देतात. इंग्रजी साम्राज्य-सत्तेच्या काळात ह्या सर्व आता कालबाह्य झालेल्या घटनांवर फडक्यांपेक्षा अधिक सांगण्याची गरज उरली नाही. पृष्ठ २६ पासून तरुण ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनी सत्ताशोधक जुन्या ब्राह्मणेतर पुढाऱ्यांबरोबर विग्रह घेण्यास सुरुवात केली यासंबंधीची हकीगत येते. ब्राह्मणेतर पक्षाला काहींनी 'रयतपक्ष' व स्वतः जवळकर यांनी 'शेतकरीपक्ष' असे नाव सुचविले (पृ. २७८). पक्षाला शेतकरी चळवळीचे स्वरूपदेखील आले होते. तुकडेबिल, लँडलीग, बार्डोली सत्याग्रह वगैरेंवर फडक्यांनी विवेचन केले आहे.

अशा ह्या परिवर्तनीय काळातच टिळकभक्त कै. अच्युतराव कोल्हटकर व खुद्द टिळकांचेच दोन चिरंजीव रामभाऊ व श्रीधरपंत जेधे–जवळकर पक्षाला येऊन मिळतात. अतिशय अभूतपूर्व व विस्मयकारक या घटना ३२ व ३३ पानावर वाचावयास मिळतात व खुद्द डॉ. आंबेडकर या सर्व मंडळींबरोबर कार्य करितात. महाड सत्याग्रहात जेधे-जवळकर देखील भाग घेतात. पण त्यांच्या सत्याग्रहात ब्राह्मणांना घेऊ नये, हे जेधे–जवळकरांचे मत मात्र आंबेडकर स्पष्टपणे नाकारतात वगैरे झालेल्या व घडलेल्या घटना व प्रसंग जसेच्या तसे श्री. फडके वर्णितात. जेधे–जवळकर हे संयुक्त सार्वजनिक चरित्र असल्यामुळे, जेधे यांच्या चरित्राची व कार्याची पुनरुक्ती ह्या प्रदीर्घ व संशोधनीय आणि निःपक्षपाती प्रस्तावनेत अटळपणे झाली आहे.

भास्करराव जाधव हे जवळकरांना जवळ करण्यात यशस्वी झाले; त्यांना विलायतेसही पाठविले. इंग्लंडहून परत आल्यावर जवळकरांनी उघड उघड राष्ट्रीय चळवळीचा मार्ग धरिला (पृ. ४६). ह्या सर्व विवेचनात इंग्रजधार्जिणे व खुर्चीवादी बनलेल्या ना. कै. जाधवांच्या राजकारणावर फडक्यांनी चांगला प्रकाश टाकला आहे. जाधवरावांचे हे धोरण पराभूत झाले व त्यांचे राजकीय नेतृत्व खलास झाले. जाधवांच्या गुणदोषांसंबंधी जेध्यांची परखड टीका फडक्यांच्या प्रस्तावनेत सापडते. एवढेच नव्हे तर अनेक धैर्यसाहसादी गुण

असलेले जवळकर 'बाई-बाटली'मुळे अधःपतित होऊन जवळजवळ जीवनातून उठले ! स्वतः दारू-खात्याचे दिवाण जाधव पूर्ण निर्व्यसनी होते. म. फुले-जेधे-शिंदे वगैरे फारच थोडी माणसे चळवळीत निर्व्यसनी राहिली. दारूबंदी हा म. फुले व स. शो. समाजाचा एक कार्यक्रम मूलतः होता. पृ. ४५ वरील यासंबंधाने केलेले श्री. फडके यांचे विवेचन आजही कार्यकर्त्यांनी व नव्या पुढाऱ्यांनी मनन करावे. "कैवारी"साठी दारूमक्तेदार यांच्या-कडून मदत घेतली गेली, हा मोठा अधःपात झाला ! प्रथम लोकहिताच्या अनेक बाबी करणारे उत्तर आयुष्यात अशी मोठी चूक (खिळा) करितात की, त्यामुळे मागील चरित्रावर व चारित्र्यावर बोळा फिरतो. जेध्यांनी मात्र जवळ-करांची पुनः संगत मुळीच केली नाही. उलट 'जेधे-गाडगीळ' असा त्यांचा नवा जन्म (अवतार) होत गेला. ह्यावेळी अगोदर कर्मवीर शिंदे सत्या-ग्रह करून तुरुंगात गेले होतेच. जवळकर-जेधे वगैरे असंख्य लहानमोठे सत्यशोधक वीर गांधींच्या राष्ट्रीय काँग्रेसमध्ये गेले व पुढे बहुजन समाजाने काँग्रेसमध्ये स्वतःचे बहुमत उत्तरोत्तर बनविले. छत्रपती मेळ्यांत म. गांधींची प्रशस्तीपर पद्ये होती (पृ ७०). म. गांधींकडे कल वाढतच गेला. शिंदे–जेध्यांचा वरील सर्व पाया पुढे मान-नीय यशवंतरावांना प्रत्यक्षाप्रत्यक्ष उपयोगी पुढे पडला. महाराष्ट्र काँग्रेस बहुजनांच्या कबजात ठेऊन चव्हाणांनी तीस-बत्तीस वर्षे महाराष्ट्रावर स्वतःची पकड राखली होती. कै. जवळकरांना वाङ्मय-सेवक म्हणून कोणी गौरविले नाही. त्यांचा मृत्युलेख ज्ञानप्रकाशने जेवढ्या गौरवाने लिहिला तेवढा दुसऱ्या कोणत्याच पत्राला लिहिता आला नाही. हा मी त्या वेळी समग्र वाचला होता. पृ. ४९ वर श्री. फडक्यांनी त्यातील काही भाग उद्धृत केला आहे. जवळकरांच्या साहित्याची लोकाभिमुखता पाहून श्री. फडके यांनी त्याची उपयुक्तता सांगून प्रदीर्घ पण अभ्यसनीय प्रस्तावना पुरी केली आहे. दोषा-धिक्यापेक्षा जवळकरांचे कार्याधिक्य व परिणामा-धिक्य जास्ती होत असल्यामुळे त्यांचा परामर्ष अटळ होतो.

महात्मा फुले प्रतिष्ठानने जमविलेल्या अनेक कागदपत्रांचा उपयोग झाला. जेधे यांच्या चरित्रा-तील घटना व प्रसंग यांमध्ये भर घालून पण पाल्हाळ न लावता फडक्यांनी समतोल भाष्ये केली आहेत. 'तटस्थ' राहून ब्राह्मणेतर पत्रातील उतारे आधारास घेऊन फडक्यांनी जी गुणदोषयुक्त व व्यंगपुराणात्मक चळवळ होऊन गेली तिचे अंतर्बाह्य जिवंत व विवेचक चित्र वाचकांपुढे उभे केले आहे. एवढा असा प्रदीर्घ प्रयत्न पूर्वी कोणाकडून घडलेला नाही. श्री. फडक्यांनी खुद्द जवळकरांच्या पुस्तकांची वाचकांना धावती ओळखही करूनदिलेली आढळते.



## सार-संकलन

पंतप्रधान श्री. राजीव गांधी ह्यांनी अलीकडे दिलेल्या एका मुलाखतीवरून ते मुरब्बी राजकारण्याप्रमाणे आवश्यक तेव्हा तोंड आवरून धरू शकतात आणि बरेच बोलूनही काहीही सांगण्याचे टाळू शकतात हे सिद्ध होते. बोलभांड राजकारण्यांना बराच काळ सहन करण्याची पाळी आलेल्या लोकांच्या दृष्टीने हा बदल सुखद ठरेल. प्रस्तुत मुलाखतीतील पुढील प्रश्नोत्तरे पहा—

प्रश्न : कार्यक्षमता वाढवायला आपण अतिशय उत्सुक आहात. ह्यासाठी कामगारांच्या संबंधीच्या कायद्यात बदल करायची तुमची इच्छा आहे का ?

उत्तर : ह्या क्षेत्रात सर्वत्र, प्रत्येक विभागात, कठीण निर्णय घ्यावे लागतील. मी तुम्हाला एवढे सांगेन की, आम्ही आज जर हे कठीण निर्णय घेतले नाहीत तर परत ही संधी कुणालाही फार काळ मिळणार नाही.

प्रश्न : आपल्याला कोणत्या प्रकारचे कठीण निर्णय अभिप्रेत आहेत ?

उत्तर : ते स्पष्ट करणे अडचणीचे ठरेल. तुम्ही ते छापले तर माझी परिस्थिती बिकट होईल.

प्रश्न : अलीकडच्या सार्वत्रिक निवडणुकीत आंध्र प्रदेशात काँग्रेसची अवस्था इतकी वाईट का झाली ?

उत्तर : कदाचित तेथील सरकार उलथून पाडण्याचा प्रयत्न झाला त्यामुळे आणि असल्याच इतर गोष्टींमुळे हे घडले असणार. पण मुख्य गोष्ट ही की, आमचा लोकांशी संपर्क तुटला होता आणि संघटनाही कमकुवत होती.

प्रश्न : प्रादेशिकतावादामुळे राष्ट्रीय एकता दुबळी होते असे आपल्याला वाटते का ? की प्रादेशिकतावादालाही सांभाळून घेऊन राष्ट्रीय जीवनात काही स्थान दिले पाहिजे ?



उत्तर : ही गोष्ट त्या त्या प्रादेशिकतावादाच्या स्वरूपावर अवलंबून राहील. तामीळनाडूत उदा., प्रादेशिक पक्ष आहेत पण ते नेहमीच भारताला अनुकूल होते. त्यांनी सवता सुभा निर्माण करण्याचे प्रयत्न केले नाहीत असे म्हणता येईल. प्रादेशिक पक्षांविषयीचा अधिक मोठा धोका हा की, त्यांना राष्ट्रकेंद्री दृष्टिकोण असत नाही. त्यांचा दृष्टिकोण चालू घडीपुरता मर्यादित असतो आणि मग तुम्ही परत 'मृदू' पर्यायांकडे येऊन ठेपता. ह्या योजनेला आर्थिक साहाय्य (सबसिडी) द्या, तिला आर्थिक साहाय्य द्या, अशा प्रकारे धोरणे ठरतात. कारण ह्यामुळे लोकप्रियता लाभते. पण हा खर्च कुणाला तरी सोसावा लागतो. आंध्रमध्ये किंवा बंगालमध्ये ही जी कृत्रिम स्वस्ताई करणारी आर्थिक मदत देण्यात येत आहे तिच्या खर्चाचा भार कुणीतरी सोसत आहे.

प्रश्न : पंजाबचा प्रश्न सोडवायला किती अवधी लागेल असा आपला अंदाज आहे ?

उत्तर : पंजाब प्रश्नावर असा निश्चित कालावधी लादता येणार नाही. आज आपण नेमके कुठे आहोत ते प्रथम पाहिले पाहिजे. आपल्यासमोर अकालींचा एक गट आहे, सरकार हा दुसरा गट आहे; पंजाबमध्ये मोठ्या संख्येने शीख, हिंदू आणि मुसलमान आणि ख्रिस्ती आणि इतर धर्मीय आहेत आणि हे अकाली नाहीत किंवा काँग्रेसचे नाहीत. हा शिखांचा प्रश्न आहे असे जेव्हा अकाली म्हणतात तेव्हा ते पंजाबमधील केवळ एका गटाविषयी बोलत असतात आणि हा पंजाबचा प्रातिनिधिक गट नाही हे आपण समजून घेतले पाहिजे. अकाली हे शिखांचेसुद्धा

अनुक्रमणिका

प्रतिनिधी नाहीत. ते पंजाबमधील काही शिखांचे प्रतिनिधित्व करतात. तेव्हा हा प्रश्न कितीतरी अधिक व्यापक आहे. आपल्याला आज ज्याची जरुरी आहे ते हे की, अकाली दलातल्या किंवा बाहेरच्या किंवा कोणत्याही गटातल्या काही शिखांनी पुढे येऊन अति-रेक्यांच्या आणि दहशतवाद्यांच्या विरुद्ध स्पष्ट भूमिका घेतली पाहिजे. आम्ही हा प्रश्न निकालात काढणार हे तर आहेच. पण असे जर ह्या लोकांनी केले तर त्याची आम्हाला खूपच मदत होईल.

प्रश्न : अकालींना बाजूला सारून हा प्रश्न तुम्हाला सोडविता येईल का ?

उत्तर : ते शिखांवर अवलंबून राहील.

प्रश्न : आपण अकालींशी पूर्वी जे बोलला होता त्यानंतर त्यांच्या वृत्तीत आपल्याला काही बदल आढळून आला आहे का ?

उत्तर : मी तर त्यांच्याशी बोललेलो नाही. त्यांच्या ज्येष्ठ पुढाऱ्यांविषयी मला काही माहीत नाही पण त्यानंतरच्या श्रेणीतले जे पुढारी आता बोलत आहेत त्यांच्या म्हणण्यात काही अनुकूल भाग आहे. पण एक दोन मंडळी आडमुठीही आहेत.

प्रश्न : राजकीय मागण्यांशिवाय शिखांमध्ये एक प्रकारची असुरक्षिततेची भावना अजून आढळून येते.

उत्तर : ह्या बाबतीत आम्ही बरेच काही केले आहे. असुरक्षिततेचा प्रमुख भाग दिल्लीमध्ये नोव्हें-बरच्या सुरवातीला होता. दिल्ली सोडून गेलेले बहुतेकजण आता परतायला लागले आहेत. अलवारचे लोक परतायला लागले आहेत आणि पंजाबमधूनही काही परतू लागले आहेत. त्यांच्या संरक्षणासाठी आणि पुनर्वसना-साठी आम्ही तजवीज केली आहे.

प्रश्न : न्यायालयीन चौकशीचे काय होते आहे ?

उत्तर : आजच्या घडीला तिचा काही उपयोग होईल असे आम्हाला वाटत नाही. आज मृतप्राय झालेले प्रश्न त्यामुळे परत डोके उचलतील.

प्रश्न : पंजाब, हरयाणा आणि हिमाचल प्रदेश ह्यांचे विलिनीकरण करावे ह्या भजनलाल ह्यांच्या प्रस्तावाविषयी आपली प्रतिक्रिया काय आहे ?

उत्तर : हा फार मोठा प्रश्न आहे आणि त्याला प्रतिक्रिया देण्यासाठी आवश्यक असलेली चर्चा आम्ही केली आहे असे मला वाटत नाही. ह्या प्रस्तावाला माझा आक्षेप अजिबात नाही. पंजाबच्या लोकांचे त्याने समाधान होत असेल तर आम्ही त्याच्यात जरूर लक्ष घालू. पण ह्या प्रश्नाच्या सोडवणुकीत पंजाबचे लोक सहभागी असले पाहिजेत. त्यांच्यावर ह्या प्रस्तावासारखे आपल्याला काही लादता येणार नाही.

प्रश्न : मार्चमध्ये पंजाबमध्ये निवडणुका घेता येतील असे आपल्याला वाटते का ?

उत्तर : ते कठीण होईल असे मला वाटते. परि-स्थिती निवळायला लागली आहे असा पंजाबकडून आमच्या हाती रिपोर्ट आलेला नाही. अर्थात लष्कर परत बराकीत गेले आहे आणि पंजाब सरहद्दीवरील आणि आघाडीवरील प्रदेश आहे हे ध्यानी घेता तेथे नेहमी जेवढे लष्कर असते त्याहून अधिक लष्कर सध्या तेथे नाही.

प्रश्न : आनंदपूर साहिब ठराव फुटीरतावादी आहे असे आपल्याला वाटते का ?

उत्तर : त्याचे भाग फुटीरतावादी आहेत, होय.

प्रश्न : पण १९७८ मध्ये तो सौम्य करण्यात आला नाही का ?

उत्तर : त्यांनी काय सौम्य केले ह्याचे स्पष्टीकरण त्यांनी केलेले नाही आणि सरकारिया आयोगाकडे जे प्रश्न आम्ही सोपवले आहेत त्यांच्या चौकटीत ह्या ठरावाविषयी आयो-गाने मतप्रदर्शन करावे ह्यासाठी तो आयोगा-कडे पाठवावा असे सुचविले आहे. पण काही कारणामुळे हे करायला अकाली उत्सुक नाहीत. सरकारने तो पाठवावा, आपण तो पाठविणार नाही असे त्यांचे म्हणणे आहे. आणि आनंदपूर साहिब ठरावासारखा ठराव सरकारिया आयोगाकडे पाठविण्याची जबाबदारी स्वीकारायला आम्ही तयार

अनुक्रमणिका

नाही. त्यांनी तो पाठवावा आणि त्याच्या गुणदोषांचे मूल्यमापन होऊ द्यावे.

प्रश्न : आसाममधील निवडणुकांचे काय ?

उत्तर : पंजाबमधील निवडणुकांहून ह्या निवडणुकांचा प्रश्न वेगळा आहे. पंजाबमध्ये कायदा आणि सुव्यवस्था ह्यांचा प्रश्न आहे. आसाममध्ये प्रश्न शिरगणतीचा आहे. आसाममध्ये उद्या निवडणुका घ्यायच्या तर आम्ही त्या घेऊ शकतो; पण मतदारांच्या याद्याच तयार नाहीत. त्या तयार झाल्या की लगेच निवडणुका घेता येतील.

प्रश्न : आसाममधील इतर प्रमुख समस्या सोडविण्याच्या बाबतीत काय होईल असा आपला अंदाज आहे ?

उत्तर : मुलांची मन:स्थिती आता तडजोडीने प्रश्न मिटवायला बरीच अनूकूल आहे असे मला वाटते. मला भेटलेल्या काही माणसांनी मला असे सांगितले आहे आणि त्यांच्या ज्या बैठका होतात त्यांच्याविषयी मला मिळालेली माहिती अशी आहे की, त्यांचे प्रश्न आम्हाला समजले आहेत आणि आम्हाला जे करता येणे शक्य आहे ते करण्याचा प्रयत्न आम्ही करीत आहो अशी त्यांची भावना आहे आणि आमच्या अडचणींचीही त्यांना कल्पना आहे.

प्रश्न : भारताला एकविसाव्या शतकात नेण्याची भाषा आपण बोलता. तिचा अर्थ कसा लावायचा ? आर्थिक दृष्टचा सध्या आपण कोणत्या शतकात आहो असे आपल्याला वाटते ?

उत्तर : हे मिश्र चित्र आहे. आपली विचार करण्याची पद्धती आपण बदलली पाहिजे. ह्या बाबतीत आपण बरेच मागासलेले आहोत. आपण येतील ते प्रश्न दैनंदिन पद्धतीने सोडवीत आहोत. आपली कसलीतरी गरज भागवायला ५ टक्के कमी पडतात. असे का ? मग कुठूनतरी ह्या ५ टक्क्यांची भरपाई करा. पण आतापासून १० वर्षांनी, १५ वर्षांनी आपल्या गरजा काय असतील, केवळ संख्येच्या दृष्टीने नव्हे तर गुणवत्तेच्या दृष्टीने काय असतील ह्याचा विचार आपण करीत नाही. आपण असा दृष्टिकोण आत्मसात केला नाही तर, पुढल्या १५ वर्षांत आपण काही साधू शकणार नाही. उदा., रस्ते घ्या. आपण हे चिंचोळे, खडबडीत रस्ते बनवितो. आपण तेच चालू ठेवणार का ? मोटारीसाठी आवश्यक असलेले रस्ते बांधणे आपल्याला परवडत नाही. पण आपण असेच खड्डेवाले रस्ते बनवीत राहिलो तर १५ वर्षांनी वाहतुकीचा पुरता गोंधळ झालेला असेल. मी रस्त्यांचे उदाहरण घेतले कारण आपणा सर्वांना त्यांच्यावरून ठेचाळत जावे लागते. आपण असा विचार करूया की, हे रस्तेबांधणीचे काम आवरावे, कमी रस्ते तयार करावे पण जेथे ते अगदी आवश्यक असतील तेथे आणि चांगले रस्ते तयार करावे.

प्रश्न : म्हणजे मूलत: आपण आपल्या प्रश्नांना वेगळ्या प्रकारे सामोरे गेले पाहिजे असे आपल्याला सुचवायचे आहे ?

उत्तर : होय. शिक्षणाविषयीचाही आपला दृष्टिकोण बदलला पाहिजे. आज आपल्या शिक्षणव्यवस्थेतून जे (माझ्या दृष्टीने) साक्षर पण अशिक्षित असलेले लोक मोठ्या संख्येने बाहेर पडत आहेत त्यात काही अर्थ नाही.

प्रश्न : पदवी आणि नोकऱ्या यांतील संबंध तोडून टाकल्याने काय साधेल असे आपल्याला वाटते ?

उत्तर : हा संबंध तोडला तर बी. ए. च्या पदवीसाठी असलेली मागणी कमी होईल. ही मागणी आहे ह्याचे कारण असे की, ही पदवी पाहिजे असे सरकार म्हणत असते.

प्रश्न : पण आपण अर्हतेची कसोटी कमी ठेवली तर बहुधा त्याच नोकऱ्यांसाठी अधिक माणसे अर्ज करतील ?

उत्तर : होय. पण त्यांतून जे अयोग्य असतील त्यांना वेचून बाहेर काढावे लागेल. जर तुम्ही योग्य प्रकारे चाचणी केली, वस्तुनिष्ठ, (पदवीपरीक्षेच्या अभ्यासक्रमाहून) स्वतंत्र आणि जलद रीतीने घेता येईल अशी कसोटी तयार

केली तर बेकार असलेले असंख्य बी. ए. पदरी बाळगण्याचे कारण उरणार नाही.

प्रश्न : पण पुरेशा नोकऱ्याच जर नसल्या तर काय करता येईल ?

उत्तर : येथे शिक्षणपद्धतीचा संबंध येऊन पोचतो. आपल्याला तिला एक वेगळी दिशा द्यावी लागेल. वेगळ्या प्रकारची कामे करू शकणारी माणसे शिकवून तयार करावी लागतील. आपल्याकडे बेकारांची जी संख्या आहे तिला आजच्या जगात उद्योगधंद्यांत नोकऱ्या देणे अशक्य आहे. वेगवेगळ्या प्रकारच्या सेवा, माहितीचे व्यवस्थापन करणे (इन्फर्मेशन हॅंड्लिंग) इ. कामांसाठी लागणारी कौशल्ये शिक्षणव्यवस्थेने शिकविली पाहिजेत. शिक्षण असे पाहिजे की, त्यासाठी मागणी असेल. आपण आपला दृष्टिकोण बदलला पाहिजे.

प्रश्न : कुटुंबनियोजनाकडे योग्य लक्ष दिले नाही तर सरकारच्या सर्व विकासयोजना फसतील. आपल्या नेतृत्वाखालील सरकार ह्या बाबतीत पूर्वीहून अधिक आक्रमक धोरण स्वीकारील का ? हा प्रश्न नाजूक आहे असे आपल्याला अजून वाटते का ?

उत्तर : होय. तो अतिशय नाजूक आहे. पण ह्या बाबतीत आपण आघाडी मारली पाहिजे. आपण ह्या बाबतीत काही धरसोड करता कामा नये, कारण नाहीतर आपण बुडून जाऊ. पण हे सर्व लोकांनी स्वेच्छेने केले पाहिजे, अगदी स्वेच्छेने. लोकांना शिक्षा देण्याऐवजी उत्तेजन दिले पाहिजे. म्हणजे परत आपण शिक्षणाशी येऊन ठेपतो. जी सुशिक्षित कुटुंबे आहेत त्यांना कमी मुले असतात.

प्रश्न : पाकिस्तानने अणुबॉंब बनविला तर परिस्थिती पूर्णपणे बदलेल असे आपण म्हटले आहे. परिस्थिती कशामुळे, कशा प्रकारे बदलेल ?

उत्तर : ह्या उपखंडात जर कुणाकडे अणुशस्त्रे आहेत असे झाले तर मग परत पूर्वस्थितीकडे जाता येणार नाही. ते अशक्य होईल. ह्यामुळे जो असमतोल निर्माण होईल त्याच्याविरोधी उपाययोजना कशी करता येईल ह्यासाठी आपल्या धोरणाचा पुनर्विचार करावा लागेल.

प्रश्न : आपण राजकारणात काहीसे काकू करीत प्रवेश केला होता. पण आता आपण अगदी शिखरावर आरूढ झाला आहात. तर आपली व्यक्तिगत साध्ये काय आहेत ?

उत्तर : मी राजकारणात शिरलो तेव्हा मला कोणतीही व्यक्तिगत साध्ये नव्हती. पण आता मी काही काळ राजकारणात आहे, लोकांशी गाठीभेटी होतात, त्यांच्या अडचणी, गरजा समजतात. हे सर्व ध्यानात घेऊन मला असे वाटते की, भारतातून दारिद्र्य नष्ट करणे हे आपले साध्य असले पाहिजे. पुढल्या ५ वर्षांत हे करता येईल असे मला म्हणायचे नाही; पण १० ते १५ वर्षांत परिस्थिती बऱ्याच प्रमाणात पालटता येईल असे मला वाटते.

प्रश्न : राजकारणात प्रवेश करण्यापूर्वी आपण शांतपणे जगत होता. सार्वजनिक प्रश्नांविषयी आपण कधी सार्वजनिक निवेदने प्रसिद्ध केली नाहीत. पण आपण जी अनेक प्रश्नांच्या बाबतीत उपक्रमशीलता दाखविली आहे तिच्यामुळे काहीसे आश्चर्य निर्माण झाले आहे. ह्या प्रश्नांविषयी आपण पूर्वी विचार करीत होता का ?

उत्तर : होय. मी त्यांच्याविषयी विचार करीत होतो; पण मी असे असे करीन आणि तुम्ही तसे का करीत नाही अशा रीतीने मी विचार करीत नव्हतो. पण माझ्या मनात हे सारे प्रश्न होते.

प्रश्न : आता त्या बाबतीत आपल्याला स्वतःला काही करता येईल अशी परिस्थिती आहे ह्याचा आपल्याला आनंद होतो का ?

उत्तर : होय, मला स्वतःला काही करता येईल ह्याचा मला आनंद होतो आणि लोकांच्या पाठिंब्याने आम्ही काही करूही शकू. पण आपली गाळण उडावी अशा लोकांच्या अपेक्षा आहेत.










